ॐ तत्सद्ब्रह्मणे नमः।

# प्रश्नोपनिषद्भाष्यार्थ.

( मूळ, अर्थ व भाष्य यांसह. )



संपादक व प्रकाशक

आचार्यभक्त-विष्णु वामन बापट.

२७० सदाशिव पेठ, पुणें.

आवृत्ति दुसरी.

—:०:—



शके १८४७ कार्तिक शुद्ध पौर्णिमा.



प्रकाशक—
विष्णु वामन बापट, यांनीं पुणें, सदाशिव
नं. २७० येथें प्रसिद्ध केलें.



# प्रस्तावना.



प्रश्नोपनिषद्भाष्यार्थाची पहिली आवृत्ति संपल्यामुळें आज ही दुसरी आवृत्ति प्रसिद्ध करीत आहों. यांत पहिल्या आवृत्तींतील कांहीं दोष काढून सुधारणा केली आहे. पुढें सविस्तर विषयानुक्रमणिका दिली आहे. सुबोध उपनिषत्संग्रहांत या उपनिषदाचें सविस्तर सिंहावलोकन केलें आहे. म्हणून येथें अधिक विस्तार करीत नाहीं. हें अथर्ववेदाचें ब्राह्मणोपनिषद् आहे. याचे सहा प्रश्न आहेत. त्यांत पिप्पलाद आचार्यांनीं भारद्वाजादि सहा शिष्यांच्या सहा प्रश्नांचीं सोपपत्तिक उत्तरें देऊन त्यांना कृतार्थ केलें आहे. ते सर्वच प्रश्न महत्त्वाचे आहेत. त्यांतल्या त्यांत शेवटचे तीन प्रश्न अधिक महत्त्वाचे आहेत. पांचव्या प्रश्नांत ॐकारोपासना सांगून सहाव्यांत साक्षात् षोडशकल पुरुषाचें प्रतिपादन केलें आहे. या आमच्या कृतीनें सर्वान्तर्यामी आचार्य आम्हांवर प्रसन्न होवोत व जिज्ञासूंना औपनिषद दर्शनाचा अभ्यास करण्याची सद्बुद्धि देवोत, अशी शुभ इच्छा व्यक्त करून ही प्रस्तावना संपवितों.

कार्तिक शु. ११ शके १८४७. } आचार्यभक्त–**विष्णुशास्त्री बापट.**



मुद्रक—
त्र्यंबक हरी आवटे, यांनीं पुणें, सदाशिव
नं. २७० येथील आपल्या इंदिरा
छापखान्यांत छापिलें.



# विषयानुक्रमणिका.



प्रश्न ४––(पृ. ३७-५५)–त्यावरून सर्व संसार हें कर्म-उपासनात्मक अपर विद्येचें फल आहे, असें जाणणाऱ्या सौर्यायणीचे ‘ या शरीरांत कोणतीं इंद्रियें निजतात, कोणतीं जागतात, स्वप्न कोण पाहतो, सुषुप्तींत सुख कोणाला होतें व सर्व जगत् कोणामध्यें लीन होतें ? ’ असे पांच अपरविद्याविषय प्रश्न ३७-३९; सूर्यकिरणांच्या न्यायानें मनामध्यें हीं सर्व इंद्रियें लीन होतात ४०-४१; एकटा प्राणच जागतो, त्याच्यामध्यें अग्निहोत्राची कल्पना व तिचें फल ४२-४३; मन हा देवच स्वप्न पाहतो, या उत्तराचें सविस्तर सोपपत्तिक विवेचन ४४-५०; मनोदेव सौरतेजानें व्याप्त झाला असतां सुषुप्त, तेव्हां सुख होतें, पक्ष्यांच्या दृष्टान्तानें सर्व आत्म्यामध्यें लीन होतें ५१-५२; आत्म्याचें हें सोपाधिक रूपच द्रष्टा, श्रोता वगैरे आहे, आत्मज्ञाचें फल ५३-५५.

प्रश्न ५––( पृ. ५५-६४ )–मरणपर्यंत प्रणवाचें ध्यान करणारा कोणत्या लोकास जातो, असा सत्यकामाचा प्रश्न ५६; ओंकार पर व अपर ब्रह्माचें प्रतीक आहे, त्याचें ध्यान करावें, अपरब्रह्मोपासकांस अपरब्रह्म प्राप्तिपूर्वक क्रममुक्ति व परब्रह्म उपासकांस परब्रह्मरूपता हें फल ५७; प्रणवाच्या मात्रांच्या द्वारा अपरब्रह्मचिंतकाला मिळणारें विशेष फल ५८-६४.

प्रश्न ६––( पृ. ६५-९६ )–‘ प्राणादि सोळा कलांनीं युक्त असलेला पुरुष कोठें आहे ’ असा भारद्वाजाचा आख्यायिकेसह प्रश्न ६५-६७; तो या अंतःशरीरांतच आहे, त्याच्यापासूनच या प्राणादि सोळा कला उद्भवतात, चैतन्यावर त्याचा आरोप, चैतन्याच्या अभेदानेंच त्यांचे उत्पत्ति-स्थिति-लय होतात, म्हणून चैतन्यच विषयाकारानें प्रतिक्षणीं उत्पन्न होतें व नाश पावतें, सर्व विषयज्ञानाचा निरोध झाला असतां सर्व शून्य होऊन राहतें, नित्य आत्म्यापासून घटादिविषय अनित्य चैतन्य उत्पन्न होतें व नाश पावतें. चैतन्य हा भूतधर्म आहे, नित्य चैतन्यच आत्मा नाम-रूपादि उपाधिधर्मांनीं भासतो, इत्यादि अनेक मतें उपलब्ध होतात, त्यांतील शेवटचें मत श्रौत असून इतर मतें भ्रान्त आहेत ६८-६९; पदार्थ व्यभिचारी व चैतन्य अव्यभिचारी आहे, ज्ञेय ज्ञानावांचून कधींच राहूं शकत नाहीं, पण ज्ञानमात्र ज्ञेयावांचून राहूं शकतें, ज्ञेयाभावाचें ज्ञान हेंहि ज्ञानच आहे. ज्ञानहि ज्ञेय आहे, असें म्हटल्यास अनवस्था दोष येतो, इत्यादि बौद्धमतावर दोष देऊन वेदान्तमतीं जें ज्ञान तें त्रिकालीं ज्ञानच व जें ज्ञेय तें ज्ञेयच असें प्रतिपादन व स्वपक्षीं दोषनिवारण ७०-७६; आत्म्याच्या ज्ञानाकरितांच त्याच्या ठिकाणीं कलांचा अध्यारोप, त्यामुळें पुरुष अन्तःशरीरांत परिच्छिन्न होत नाहीं, इत्यादि आक्षेपनिरसनपूर्वक सोपपत्तिक विवेचन ७७-७९; ईक्षणपूर्वक प्राणादिकांची सृष्टि, याच प्रसंगानें सांख्यांच्या प्रधानकर्तृत्वाचें निरसन ८०-९२; नदीदृष्टान्तानें सर्वजगाचा पूर्णात्म्यामध्यें आरोप, तो पुरुषच वेद्य, त्यालाच जाणल्यानें मृत्यूची व्यथा होत नाहीं, इत्यादि उपदेश, सुकेशादिकांनीं केलेली आचार्यांची पूजापूर्वक स्तुति ९३-९६.

---

ॐतत्सद्ब्रह्मणे नमः।

# प्रश्नोपनिषद्भाष्यार्थ.

( मूळ, अर्थ व भाष्य यांसह. )

ॐ भद्रं कर्णेभिः शृणुयाम देवाः । भद्रं पश्येमाक्षिभिर्यजत्राः ।
स्थिरैरङ्गैस्तुष्टुवाँसस्तनूभिः । व्यशेम देवहितं यदायुः ॥
ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः ॥

**शांतीचा अर्थ**—अहो देवांनो, आम्हीं कानांनीं भद्र–कल्याण–शुभ वचन ऐकावें; आणि यागास समर्थ होऊन आम्हीं नेत्रांनीं भद्रच पहावें. स्थिर अंगांनीं व शरीरांनीं आम्ही तुमची स्तुति करणारे होत्साते देवानें दिलेल्या सर्व आयुष्यास प्राप्त होऊं.

स्वस्ति न इन्द्रो वृद्धश्रवाः स्वस्ति नः पूषा विश्ववेदाः ।
स्वस्ति नः तार्क्ष्यो अरिष्टनेमिः स्वस्ति नो बृहस्पतिर्दधातु ॥
ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः ॥

**अर्थ**—'वृद्धश्रवाः इन्द्रः नः स्वस्ति दधातु'–ज्याचें यश समृद्ध आहे असा इंद्र आम्हांला स्वस्ति देवो–आमचें पोषण करो–'विश्ववेदाः पूषा नः स्वस्ति दधातु'–बहुज्ञानवान् अथवा बहु धनवान् पूषा आम्हांला स्वस्ति करो. 'अरिष्टनेमिः तार्क्ष्यः नः स्वस्ति दधातु'–ज्याच्या रथाची चक्रनेमि फार दूर गमन केलें तरी राक्षसांकडून छिन्न भिन्न केली जात नाहीं, असा गरुड आम्हांला स्वस्ति करो. तसाच 'बृहस्पतिः नः स्वस्ति दधातु'–बृहस्पति आम्हांला स्वस्ति करो. त्रिविध तापांची शांति होवो.

**भाष्यं—मन्त्रोक्तस्यार्थस्य विस्तरानुवादीदं ब्राह्मणमारभ्यते । ऋषिप्रश्नप्रतिवचनाख्यायिका तु विद्यास्तुतये । एवं संवत्सरब्रह्मचर्यसंवासादियुक्तैस्तपोयुक्तैर्ग्राह्या पिप्पलादादिवत्सर्वज्ञकल्पैराचार्यैर्वक्तव्या च । न सा येन केनचिदिति विद्यां स्तौति । ब्रह्मचर्यादिसाधनसूचनाच्च तत्कर्तव्यता स्यात् ॥**

**भाष्यार्थ**—( प्रसिद्ध दशोपनिषदांतील मुण्डक, प्रश्न व माण्डूक्य हीं तीन अथर्वण वेदाचीं उपनिषदें आहेत. पण त्यांतील माण्डूक्य स्वतंत्र असून ) मुण्डकांत

मंत्रांनीं सांगितलेल्या अर्थाचा सविस्तर अनुवाद करणारें हें ब्राह्मणोपनिषद् आरंभिलें जातें. ( म्हणूनच आचार्यांच्या संप्रदायाचे संन्यासी वेदान्तविद्यार्थ्यांना प्रस्थानत्रयाचा पाठ सांगतांना ईश, केन व कठ हीं तीन उपनिषदें होतांच अगोदर मुण्डकभाष्य सांगून नंतर प्रश्नाच्या भाष्याचा पाठ सांगतात. मुण्डक हें मन्त्रोपनिषद् आहे. मंत्र व ब्राह्मण या दोहोंनाहि 'वेद-'नांव आहे. त्यांतील मंत्रांनींच आत्मतत्त्वाचा निर्णय जरी केला आहे तरी हें ब्राह्मणोपनिषद् प्राणोपासनादि साधनांसह त्याचाच विस्तर करीत असल्यामुळें त्याच्यावर पुनरुक्त दोष येत नाहीं. असो; आतां आम्ही त्या ब्राह्मणोपनिषदाच्या व्याख्यानाला आरंभ करितों–)=सुकेशादि सहा ऋषींचे प्रश्न व पिप्पलाद आचार्यांचें प्रतिवचन, इत्यादिरूप आख्यायिकेची जी येथें कल्पना केली आहे ती ब्रह्मविद्येच्या स्तुतीकरितां आहे. ब्रह्मविद्या अशारीतीनें एक संवत्सर ब्रह्मचर्य व्रत, गुरुगृहीं वास यांनीं युक्त व तपोयुक्त पुरुपांकडूनच ग्रहण करण्यास योग्य आहे, ( ब्रह्मचर्य, गुरुगृहनिवास व तप यांनीं रहित असलेल्या पुरुषांस ती ग्राह्य नाहीं ) आणि पिप्पलादांसारख्या सर्वज्ञसदृश आचार्यांनींच तिचा उपदेश करणें उचित आहे; ती अशाच कोणाकडून तरी उपदेशिली जाण्यास योग्य नाहीं; अशा रीतीनें वेद विद्येची स्तुति करितो आणि त्या आख्यायिकेंत ब्रह्मचर्यादि साधनें सुचविलेलीं असल्यामुळें तीं अवश्य केलीं पाहिजेत, असें होतें.

श्रुतिः--ॐ **सुकेशा च भारद्वाजः शैब्यश्च सत्यकामः सौर्यायणी च गार्ग्यः कौसल्यश्चाऽऽश्वलायनो भार्गवो वैदर्भिः कबन्धी कात्यायनस्ते हैते ब्रह्मपरा ब्रह्मनिष्ठाः परं ब्रह्मान्वेषमाणा एष ह वै तत्सर्वं वक्ष्यतीति ते ह समित्पाणयो भगवन्तं पिप्पलादमुपसन्नाः ॥ १ ॥**

**अर्थ**—भारद्वाज सुकेशा, शैब्य सत्यकाम, गार्ग्य सौर्यायणि, आश्वलायन कौसल्य, भार्गव वैदर्भि व कात्यायन कबंधी, असे हे सहा ऋषी अपर ब्रह्माला पर ब्रह्म समजून, वेदोक्त अनुष्ठान करण्यांत अगदीं तत्पर होऊन राहिले होते. परंतु पुढें थोडासा विचार करितांच त्यांना पर ब्रह्म निराळेंच असलें पाहिजे, असें वाटून ते सर्वजण ब्रह्मनिष्ठ झाले. ( अपर ब्रह्म अनित्य आहे. कारण तेंहि कार्य आहे. कोणतेंहि कार्य जन्य–उत्पन्न होणारें असल्यामुळें अनित्य असतें, असा न्याय व अनुभवहि आहे. अपर ब्रह्म म्हणजे मायाशबल ब्रह्म, हिरण्यगर्भ; त्याला आदि आहे. तस्मात् कधीं तरी त्याचा अंतहि होणारच ! असा निश्चय करून व पर ब्रह्माचें अन्वेषण करणारे ते हा आम्हांला तें सर्व सांगेल, असें समजून समित्पाणि होऊन भगवान् पिप्पलादापाशीं शिष्यभावानें आले. १.

**भाष्यं—सुकेशा च नामतः । भरद्वाजस्यापत्यं भारद्वाजः । शैब्यश्च शिबेरपत्यं शैब्यः सत्यकामो नामतः । सौर्यायणी सूर्यस्तस्यापत्यं सौर्यस्तस्यापत्यं सौर्यायणिश्छान्दसः सौर्यायणीति । गार्ग्यो गर्गगोत्रोत्पन्नः । कौसल्यश्च नामतोऽश्वलस्यापत्यमाश्वलायनः । भार्गवो भृगोर्गोत्रापत्यं भार्गवः । वैदर्भिर्विदर्भे भवः । कबन्धी नामतः । कत्यस्यापत्यं कात्यायनः । विद्यमानः प्रपितामहो यस्य सः । युवप्रत्ययः । ते हैते ब्रह्मपरा अपरं ब्रह्म परत्वेन गतास्तदनुष्ठाननिष्ठाश्च ब्रह्मनिष्ठाः परं ब्रह्मान्वेषमाणाः । किं तत् । यन्नित्यं विज्ञेयमिति तत्प्राप्त्यर्थं यथाकामं यतिष्याम इत्येवं तदन्वेषणं कुर्वन्तस्तदधिगमायैष ह वै तत्सर्वं वक्ष्यतीत्याचार्यमुपजग्मुः । कथम् । ते ह समित्पाणयः समिद्भारगृहीतहस्ताः सन्तो भगवन्तं पिप्पलादमाचार्यमुपसन्ना उपजग्मुः ॥ १ ॥**

**भाष्यार्थ**—' सुकेशा '-नांवाचा ' भारद्वाज '-भरद्वाजाचें अपत्य; ' शैब्य ' —शिबीचें अपत्य तो शैब्य; ' सत्यकाम '-नांवाचा ( शैब्य ); ( येथील भारद्वाज, शैब्य इत्यादि कुलगोत्रसूचक विशेषणें असून सुकेशा, सत्यकाम इत्यादि नांवें आहेत.) =' सौर्यायणी '-सूर्याचें अपत्य-सौर्य व त्या सौर्याचें जें अपत्य तो सौर्यायणि; मुळांत ' सौर्यायणी ' असा जो दीर्घ प्रयोग केला आहे तो छान्दस आहे; ' गार्ग्यः '-गर्गगोत्रांत उत्पन्न झालेला ( सौर्यायणिः ); ' कौसल्य' या नांवाचा 'आश्वलायन'-अश्वलाचें अपत्य; ' भार्गवः '-भृगूचें गोत्रापत्य भार्गव; ' वैदर्भिः '-विदर्भांत झालेला; ' कबन्धी '-या नांवाचा, कत्याचें अपत्य ' कात्यायनः '-ज्याचा प्रपितामह विद्यमान आहे तो कात्यायन; ' कत्य ' या शब्दाला ' फक् ( आयन ) ' हा युवप्रत्यय झाला आहे. ' ते हैते ब्रह्मपराः '-ते हे अपर ब्रह्माला पर ब्रह्म समजलेले आणि ' ब्रह्मनिष्ठाः '-त्याच्या संतोषार्थ कर्म व उपासना करण्यांत तत्पर झालेले ' परं ब्रह्म अन्वेषमाणाः '-जें नित्य विज्ञेय तें काय आहे, त्याच्यामध्यें कोणतें आधिक्य आहे, अशा उद्देशानें त्याच्या प्राप्त्यर्थ आपल्या इच्छेप्रमाणें यत्न करूं या, अशा प्रकारें त्याचें अन्वेषण करणारे ते त्याच्या साक्षात्कारासाठीं ' एष ह वै० '-हा तें सर्व सांगेल, असें समजून आचार्यापाशीं गेले. ते कसे? ' ते ह समित्पाणयः '-ज्यांनीं आपल्या हातांत समिधांचा भार-जुडी घेतली आहे असे होत्साते 'भगवन्तं पिप्पलादं०'-भगवान्-पूजावान् पिप्पलादनामक आचार्यापाशीं प्राप्त झाले. ( गुरूपाशीं हातांत समिधा घेऊन जाणें, हें ' मी आपला शिष्य होऊन, आपली सेवा करण्यास तयार आहें ' असें सुचविणेंच आहे. समिधांबरोबर दांत घासण्याच्या काड्या इत्यादि दुसरेहि उपयुक्त पदार्थ त्यांनीं हातांतून नेलें, असें जाणावें. ) १.

**श्रुतिः—तान्ह स ऋषिरुवाच भूय एव तपसा ब्रह्मचर्येण श्रद्धया संवत्सरं संवत्स्यथ यथाकामं प्रश्नान्पृच्छत यदि विज्ञास्यामः सर्वं ह वो वक्ष्याम इति ॥ २ ॥**

**अर्थ**—त्यांना तो ऋषि ह्मणाला, तुह्मी पुनरपि तप, ब्रह्मचर्य व श्रद्धा यांनीं युक्त होऊन एक संवत्सर येथें रहा. नंतर आपापल्या इच्छेप्रमाणें प्रश्न विचारा. जर आम्ही जाणत असलों तर तें सर्व तुम्हांला सांगूं. २.

**भाष्यं—तानेवमुपगतान्ह स किल ऋषिरुवाच भूयः पुनरेव यद्यपि यूयं पूर्वं तपस्विन एव तपसेन्द्रियसंयमेन तथाऽपीह विशेषतो ब्रह्मचर्येण श्रद्धया चाऽऽस्तिक्यबुद्धयाऽऽदरवन्तः संवत्सरं कालं संवत्स्यथ सम्यग्गुरुशुश्रूषापराः सन्तो वत्स्यथ। ततो यथाकामं यो यस्य कामस्तमनतिक्रम्य यथाकामं यद्विषये यस्य जिज्ञासा तद्विषयान्प्रश्नान्पृच्छत। यदि तद्युष्मत्पृष्टं विज्ञास्यामः। अनुद्धतत्वप्रदर्शनार्थो यदिशब्दो नाज्ञानसंशयार्थः प्रश्ननिर्णयादवसीयते। सर्वं ह वो वः पृष्टं वक्ष्याम इति ॥ २ ॥**

**भाष्यार्थ**—‘ तान् ह स ऋषिः उवाच ’–वर वर्णन केल्याप्रमाणें ( मोठे जिज्ञासु होऊन व हातांत समिधादि सेवेची सामग्री घेऊन– )=समीप आलेल्या त्या सहा जणांस ऋषि म्हणाला,–‘ भूय एव तपसा० ’–तुम्ही जरी पूर्वीच तपानें–इंद्रियसंयमनानें तपस्वी आहां तरी पुनरपि येथें मजपाशीं विशेषतः ब्रह्मचर्यानें ( स्त्रीस्मरण, कीर्तन, क्रीडा, तिच्याकडे पाहणें, गुह्य भाषण करणें, संकल्प करणें, निश्चय करणें व प्रत्यक्ष संयोग या आठी प्रकारच्या मैथुनास वर्ज्य करणें हें विशिष्ट ब्रह्मचर्य होय. ) व श्रद्धेनें–आस्तिक्यबुद्धीनें आदरवान् होऊन एक वर्षभर रहा; उत्तम गुरुशुश्रूषा करण्यामध्यें तत्पर होऊन येथें निवास करा. ‘ यथा कामं प्रश्नान्० ’–त्यानंतर ज्याची जी इच्छा असेल तिच्या अनुरोधानें–आपल्या कामनेचें अतिक्रमण न करितां, ज्याला जें जाणण्याची इच्छा असेल त्याविषयीं तुम्ही मला प्रश्न विचारा. तुम्ही जें विचाराल तें आम्हांला जर ठाऊक असलें तर ( आम्ही सर्व तुम्हांला सांगूं. )=आपलें नम्रत्व प्रकट करण्याकरितां येथें ‘ यदि ’ हा ‘ जर ठाऊक असलें तर ’ या अर्थाचा शब्द आहे, त्यांना विज्ञेय परब्रह्माचें अज्ञान, किंवा त्याविषयीं संशय होता, म्हणून तो नाहीं. कारण प्रश्नाच्या निर्णयावरून, शालीनता प्रकट करण्याकरितांच, त्यांनीं असें म्हटलें आहे, असा निश्चय होतो. ‘ सर्वं ह वो वक्ष्यामः ’–तुम्हीं विचारलेलें सर्व तुम्हांला सांगूं, असें म्हणाला. २.

**श्रुतिः—अथ कबन्धी कात्यायन उपेत्य पप्रच्छ । भगवन्कुतो ह वा इमाः प्रजाः प्रजायन्त इति ॥ ३ ॥**

**अर्थ**—नंतर कात्यायन कबंधी गुरूपाशीं येऊन विचारूं लागला, " भगवन्, या सर्व प्रजा कोणापासून उत्पन्न होतात ? " ३.

**भाष्यं—अथ संवत्सरादूर्ध्वं कबन्धी कात्यायन उपेत्योपगम्य पप्रच्छ पृष्टवान् । हे भगवन्कुतः कस्माद्ध वा इमा ब्राह्मणाद्याः प्रजाः प्रजायन्त उत्पद्यन्ते।अपरविद्याकर्मणोः समुच्चितयोर्यत्कार्यं या गतिस्तद्वक्तव्यमिति तदर्थोऽयं प्रश्नः ॥३॥**

**भाष्यार्थ**—' अथ कबन्धी० '–आचार्यांच्या आज्ञेप्रमाणें एक वर्षभर ब्रह्मचर्यादि पाळून त्यानंतर ( पूर्वोक्त मुनींतील सहावा ) कात्यायन कबंधी गुरूपाशीं येऊन असें विचारता झाला–' भगवन् कुतो० '–भगवन्, ही ब्राह्मणादि प्रजा कोणापासून उत्पन्न होते ? समुचित–सहअनुष्ठित–अपरविद्या ( उपासना ) व कर्म ( आणि नुस्तें कर्म ) यांचें जें कार्य, यांची जी गति ती सांगावी, म्हणून हा प्रश्न ( व प्रतिवचन ) आहे. ( पर ब्रह्माचा शोध करण्याच्या इच्छेनें आलेल्या मुनींचा उपासना व कर्म यांच्या फलाविषयींचा हा प्रश्न जरी असंगतसा भासला तरी तो तसा नाहीं. कारण कर्मादिकांच्या फलाविषयीं विरक्त झालेल्या पुरुषालाच ब्रह्मजिज्ञासेचा अधिकार असतो, असा नियम असल्यामुळें वैराग्याकरितांच हें वर्णन आहे. येथील प्रश्न व प्रतिवचन यांतील शब्दांवरून सृष्टीचें वर्णन जरी प्रतीत होत असलें तरी तें करण्यांत कांहीं विशेष प्रयोजन नसल्यामुळें सृष्टिवर्णनाच्या मिषानें येथें अपरविद्येचें फलच सांगितलें आहे. ) ३.

**श्रुतिः—तस्मै स होवाच प्रजाकामो वै प्रजापतिः स तपोऽतप्यत स तपस्तप्त्वा स मिथुनमुत्पादयते । रयिं च प्राणं चेत्येतौ मे बहुधा प्रजाः करिष्यत इति ॥ ४ ॥**

**अर्थ**—त्याला तो पिप्पलाद म्हणाला–आपल्या प्रजा उत्पन्न करण्याची इच्छा करणारा प्रजापति तप करिता झाला. तो तप करून जोडप्याला उत्पन्न करिता झाला. रयि व प्राण; हे दोघे माझी प्रजा पुष्कळप्रकारें उत्पन्न करतील असें ( चिंतन करून तो सूर्य व सोम यांना उत्पन्न करिता झाला. ) ४.

**भाष्यं—तस्मा एवं पृष्टवते स होवाच तदपाकरणायाऽऽह । प्रजाकामः प्रजा आत्मनः सिसृक्षुर्वै प्रजापतिः सर्वात्मा सञ्जगत्स्रक्ष्यामीत्येवं विज्ञानवान्यथोक्तकारी तद्भावभावितः कल्पादौ निर्वृतो हिरण्यगर्भः सृज्यमानानां प्रजानां स्थावरजङ्गमानां पतिः सञ्जन्मान्तरभावितं ज्ञानं श्रुतिप्रकाशितार्थविषयं तपोऽन्वालोचयदतप्यत ॥**

**भाष्यार्थ**--' तस्मै स होवाच '-असा प्रश्न करणाऱ्या शिष्याला आचार्य, त्याची शंका घालविण्याकरितां म्हणाला-' प्रजाकामो वै० '-आपली प्रजा निर्माण करण्याची इच्छा करणारा प्रजापति मी सर्वात्मा होऊन जगत् निर्माण करीन, असें विज्ञान ज्याला आहे, पूर्व कल्पांत देवतोपासना व कर्म यांचें समुच्चयानें ज्यानें अनुष्ठान केलें आहे, मी सर्वात्मा प्रजापति आहें, या उपासनेच्या वेळीं केलेल्या प्रजापतिभावनेनें जो युक्त आहे व त्या भावनेच्या अनुरोधानेंच या कल्पाच्या आरंभीं हिरण्य-गर्भरूपानें जो प्रकट झाला आहे, तो ' प्रजापति '-स्थावर-जंगमांचा पति ( स्वामी ) होऊन पूर्वजन्मीं ज्याची भावना केली होती तें श्रुतिप्रकाशित अर्थविषयक ज्ञान ( म्हणजेच तप ) संपादन करिता झाला. ( येथील हें तप म्हणजे आलोचन, चिंतन असें समजावें. त्यानें पूर्व संस्कारास जागृत करून सृष्टिसंबंधी ज्ञान उत्पन्न केलें. प्रथम आदित्य व चंद्र यांस निर्माण करून व स्वत: त्यांच्या स्वरूपास प्राप्त होऊन, त्यानंतर चंद्र-सूर्यांच्या योगानें साध्य होणाऱ्या संवत्सरभावास प्राप्त होऊन, त्याच्याहि नंतर संवत्सराच्या अवयवभूत अशीं दोन अयनें, ऋतु, मास, पक्ष, अहोरात्र इत्यादि भावास प्राप्त होऊन त्यानंतर त्या अयनादिकांच्या योगानें साध्य होणाऱ्या व्रीहि, यव इत्यादि अन्नभावास व अन्नापासून रेतोभावास प्राप्त होऊन त्या रेतानें मी प्रजा निर्माण करीन असा त्यानें निश्चय केला. )

**भाष्यं--अथ तु स एवं तपस्तप्त्वा श्रौतं ज्ञानमन्वालोच्य सृष्टिसाधनभूतं मिथुनमुत्पादयते मिथुनं द्वन्द्वमुत्पादितवान्। रयिं च सोममन्नं प्राणं चाग्निमत्तारमेतावग्नीषोमावत्त्रन्नभूतौ मे मम बहुधाऽनेकधा प्रजाः करिष्यत इत्येवं संचिन्त्याण्डोत्पत्तिक्रमेण सूर्याचंद्रमसावकल्पयत्॥ ४॥**

**भाष्यार्थ**--' स तपस्तप्त्वा '-अशा प्रकारें श्रौत ज्ञानाचें आलोचन करून ' स मिथुनमुत्पादयते '-तो सृष्टिसाधनभूत रयि व प्राण या नांवाचें जोडपें निर्माण करिता झाला. रयि म्हणजे सोम ( चंद्र ) अन्न व प्राण म्हणजे अग्नि, अत्ता ( भक्षक ) ' एतौ मे बहुधा० '-अत्ता व अन्न झालेले हे दोघे अग्नि-सोम माझी बहुतप्रकारें प्रजा करतील, असा मनांत विचार करून ब्रह्मांडादि-उत्पत्तीच्या क्रमानें ( म्हणजे प्रथम आकाशादि पांच सूक्ष्म भूतें, त्यानंतर पंचीकरणानें स्थूल भूतें, चतुर्दश लोक, ब्रह्मांड इत्यादि क्रमानें-)=सूर्य व चंद्र यांस उत्पन्न करिता झाला. ( सूर्य व अग्नि यांचें येथें एकत्व विवक्षित आहे. ) ४.

**श्रुतिः--आदित्यो ह वै प्राणो रयिरेव चन्द्रमा रयिर्वा एतत्सर्वं यन्मूर्तं चामूर्तं च तस्मान्मूर्तिरेव रयिः॥ ५॥**

**अर्थ**--आदित्य हाच प्राण व रयिच चंद्रमा. जें मूर्त व अमूर्त आहे तें हें सर्व रयिच आहे. तस्मात् मूर्तिच रयि होय. ५.

**भाष्यं—तत्राऽऽदित्यो ह वै प्राणोऽत्ताऽग्निः । रयिरेव चन्द्रमाः । रयिरेवान्नं सोम एव । तदेतदेकमत्ता चान्नं च प्रजापतिरेकं तु मिथुनम् । गुणप्रधानकृतो भेदः । कथम् । रयिर्वा अन्नं वा एतत्सर्वं किं तद्यन्मूर्तं च स्थूलं चामूर्तं च सूक्ष्मं च मूर्तामूर्ते अत्त्रन्नरूपे रयिरेव । तस्मात्प्रविभक्तादमूर्ताद्यदन्यन्मूर्तरूपं मूर्तिः सैव रयिरमूर्तेनाद्यमानत्वात् ॥ ५ ॥**

**भाष्यार्थ**—त्या जोडप्यांतील ' आदित्यो ह वै प्राणः '–आदित्य हाच प्राण, अत्ता, अग्नि आणि ' रयिरेव चन्द्रमाः '–रयिच अन्न–चंद्रमाच होय. अत्ता व अन्न हें एकच–प्रजापतीच आहे. कोणतेंहि मिथुन ( जोडपें ) एकच असतें. ( ' पण एकाच्याच स्वरूपांत अत्ता व अन्न असा भेद कसा असणार ? ' अशी शंका घेऊं नये. ) कारण त्यांतील भेद गुणप्रधानकृत आहे. [ म्ह० गुणभावाच्या विवक्षेनें–जडरूपानें अन्नत्व व प्राधान्याच्या विवक्षेनें–चेतनतेनें अतृत्व, एकाच्याच ठिकाणीं संभवतें. ]= रयि व प्राण यांना प्रजापतिरूपत्व कसें, म्हणून विचाराल तर सांगतों–' रयिर्वा एतत्सर्वं '–अन्नच हें सर्व आहे. हें तें काय ? ' यन्मूर्तं चामूर्तं च '–हें जें सर्व स्थूल व सूक्ष्म मूर्तामूर्त–अतृ-अन्नरूप आहे ती रयिच होय. ( अर्थात् रयि अशा रीतीनें सर्वात्मक असल्यामुळें तिला प्रजापतिरूपत्व आहे. वायु, आकाश इत्यादि अमूर्त पदार्थांनाहि कोणी भक्षण करितात, त्यांचाहि उपभोग घेतातच. म्हणूनच त्यांनाहि रयित्व आहे. येथें मूर्त व अमूर्त हा विभाग न करितां केवल सर्व वस्तूंना गौणभाव आहे, या विवक्षेनें सर्व रयि, असें म्हटलें आहे. पण त्या दोहोंचा विभाग करून गौणप्रधानभावानें जेव्हां त्यांचा निर्देश करावयाचा असतो तेव्हां अमूर्त प्राणाकडून मूर्त खाल्लें जात असल्यामुळें मूर्तिच ' रयि ' आहे असें सांगतात–)=' तस्मान्मूर्तिरेव रयिः '–तस्मात्–त्या अगदीं विभक्त अमूर्ताहून जें दुसरें मूर्तरूप–मूर्ति तीच रयि. कारण ती अमूर्ताकडून खाल्ली जाते. ५

**श्रुतिः—अथाऽऽदित्य उदयन्यत्प्राचीं दिशं प्रविशति तेन प्राच्यान्प्राणान्रश्मिषु संनिधत्ते । यद्दक्षिणां यत्प्रतीचीं यदुदीचीं यदधो यदूर्ध्वं यदन्तरा दिशो यत्सर्वं प्रकाशयति तेन सर्वान्प्राणान्रश्मिषु संनिधत्ते ॥ ६ ॥**

**अर्थ**—आतां आदित्य वर गमन करीत होत्साता जो पूर्व दिशेंत प्रवेश करितो त्याच्या योगानें प्राच्य–पूर्व दिशेंतील प्राणांस रश्मींमध्यें प्रविष्ट करितो. तो जो दक्षिण,

प्रतीची, उदीची, अधोदिशा ऊर्ध्व दिशा, अवान्तर दिशा, व दुसरें सर्व यांस प्रकाशित करितो, त्याच्या योगानें सर्व प्राणांस किरणांत संनिविष्ट करितो. ६.

**भाष्यं--तथाऽमूर्तोऽपि प्राणोऽत्ता सर्वमेव यच्चाऽऽद्यम् । कथम्-अथाऽऽदित्य उदयन्नुद्गच्छन्प्राणिनां चक्षुर्गोचरमागच्छन्यत्प्राचीं दिशं स्वप्रकाशेन प्रविशति व्याप्नोति । तेन स्वात्मव्याप्त्या सर्वांस्तत्स्थान्प्राणान्प्राच्यानन्तर्भूतान्रश्मिषु स्वात्मावभासरूपेषु व्याप्तिमत्सु व्याप्तत्वात्प्राणिनः संनिधत्ते संनिवेशयति । आत्मभूतान्करोतीत्यर्थः । तथैव यत्प्रविशति दक्षिणां यत्प्रतीचीं यदुदीचीमध ऊर्ध्वं यत्प्रविशति यच्चान्तरा दिशः कोणदिशोऽवान्तरदिशो यच्चान्यत्सर्वं प्रकाशयति तेन स्वप्रकाशव्याप्त्या सर्वान्सर्वदिक्स्थान्प्राणान्रश्मिषु संनिधत्ते ॥ ६ ॥**

**भाष्यार्थ**--( वरील खंडांत रयि या नांवाच्या अन्नाला प्रजापतित्व आहे, हें सांगण्याकरितां रयि सर्वात्मक आहे असें प्रतिपादिलें. आतां प्राणाचेंहि सर्वात्मत्व याचसाठीं सांगतात-)=त्याचप्रमाणें अमूर्तहि प्राण-अत्ता सर्वच जें आद्य-भक्ष्य, अन्न तें आहे. तो कसा ? ( म्हणून विचाराल तर सांगतों-)=आदित्य उदय पावत असतांना प्राण्यांच्या दृष्टिगोचर होतसाता जो पूर्व दिशेंत आपल्या प्रकाशानें प्रवेश करितो, तिला स्वप्रकाशानें व्यापून सोडतो, तो त्या आपल्या व्याप्तीनें तेथील, पूर्व दिशेंत अंतर्भूत होणाऱ्या, सर्व प्राण्यांस आपल्या प्रभारूप किरणांत 'संनिधत्ते'-प्रविष्ट करितो; त्या सर्व प्राण्यांना आत्मभूत करितो, असा भावार्थ. कारण त्याच्या व्याप्तियुक्त किरणांमध्यें प्राणी व्याप्त असतात. त्याचप्रमाणें तो आपल्या प्रभेनें दक्षिण पश्चिम, उत्तर, अधर, ऊर्ध्व व आग्नेय्यादि कोणांतील अवांतर दिशा आणि त्याचप्रमाणें दुसरेंहि सर्व यांस तो जो प्रकाशित करितो त्या स्वप्रकाशव्याप्तीनें सर्व दिशांतील प्राणांस आपल्या किरणांत प्रविष्ट करितो. ६.

**श्रुतिः—स एष वैश्वानरो विश्वरूपः प्राणोऽग्निरुदयते । तदेतदृचाऽभ्युक्तम् ॥ ७**

**अर्थ**---तो हा वैश्वानर विश्वरूप प्राण अग्नि उदय पावतो. तें हें तत्त्व ऋचेनें सांगितलें आहे. ७

**भाष्यं--स एषोऽत्ता प्राणो वैश्वानरः सर्वात्मा विश्वरूपो विश्वात्मत्वाच्च प्राणोऽग्निश्च स एवात्तोदयत उद्गच्छति प्रत्यहं सर्वा दिश आत्मसात्कुर्वन् । तदेतदुक्तं वस्तु ऋचा मन्त्रेणाप्यभ्युक्तम् ॥ ७ ॥**

**भाष्यार्थ**—तो हा अत्ता प्राण 'वैश्वानर'-सर्वात्मा ( सर्व जीवात्मक ), विश्वात्मा असल्यामुळें 'विश्वरूप' ( सर्व प्रपंचात्मक ), व विश्वात्मा असल्यामुळेंच प्राण व

अग्नि होय. तोच अत्ता ( भक्षक ) प्रतिदिवशीं सर्व दिशांना आपल्या अधीन ( पूर्णपणें आत्मरूप ) करीत 'उदयते'–उदय पावतो. येथें प्रतिपादन केलेलें हेंच तत्त्व एका मंत्रानेंहि सांगितलें आहे. ७

**श्रुतिः—विश्वरूपं हरिणं जातवेदसं परायणं ज्योतिरेकं तपन्तम् । सहस्ररश्मिः शतधा वर्तमानः प्राणः प्रजानामुदयत्येष सूर्यः ॥ ८ ॥**

**अर्थ—**सर्वरूप, किरणवान्, ज्ञानी, सर्व प्राणाश्रय, एक ज्योति व संतापक्रिया करणारा अशा स्वात्म्याला विद्वान् जाणते झाले. हा सहस्रकिरण व शतधा राहणारा प्रजांचा प्राण–सूर्य उदय पावतो. ८.

**भाष्यं—विश्वरूपं सर्वरूपं हरिणं रश्मिवन्तं जातवेदसं जातप्रज्ञानं परायणं सर्वप्राणाश्रयं ज्योतिरेकं सर्वप्राणिनां चक्षुर्भूतमद्वितीयं तपन्तं तापक्रियां कुर्वाणं स्वात्मानं सूर्यं सूरयो विज्ञातवन्तो ब्रह्मविदः । कोऽसौ यं विज्ञातवन्तः । सहस्ररश्मिरनेकरश्मिः शतधाऽनेकधा प्राणिभेदेन वर्तमानः प्राणः प्रजानामुदयत्येष सूर्यः ॥ ८ ॥**

**भाष्यार्थ—**( पूर्वोक्त वस्तुस्थितीचें वर्णन करणाऱ्या 'विश्वरूपं हरिणं जातवेदसं०' इत्यादि मंत्राचा अर्थ असा–)=' विश्वरूपं '–सर्वरूप, 'हरिणं'–किरणवान्, 'जातवेदसं '–आत्मसाक्षात्कारवान् ' परायणं '–सर्व प्राणांचा आश्रय, 'ज्योतिरेकं' सर्व प्राण्यांची दृक्शक्तिभूत एक ज्योति व ' तपन्तं '–तापक्रिया ( ताप, संताप देणें ही क्रिया ) करणारा अशा स्वात्म्याला, सूर्याला ब्रह्मवेत्ते जाणते झाले. ज्याला त्या सुरींनीं–ज्ञान्यांनीं जाणलें, तो कोण म्हणून विचाराल तर सांगतों–' सहस्ररश्मिः ' –ज्याचे किरण अनेक आहेत व जो भिन्न भिन्न प्राण्यांच्या योगानें ' शतधा '–अनेक प्रकारचा होऊन राहिला आहे तो हा प्रजांचा–लोकांचा, सर्व जीवांचा प्राण, सूर्य उदय पावतो. ८.

**श्रुतिः—संवत्सरो वै प्रजापतिस्तस्यायने दक्षिणं चोत्तरं च । तद्ये ह वै तदिष्टापूर्ते कृतमित्युपासते । ते चान्द्रमसमेव लोकमभिजयन्ते । त एव पुनरावर्तन्ते तस्मादेत ऋषयः प्रजाकामा दक्षिणं प्रतिपद्यन्ते । एष ह वै रयिर्यः पितृयाणः ॥ ९ ॥**

**अर्थ—**संवत्सरच प्रजापति आहे. दक्षिण व उत्तर हीं त्याचीं अयनें आहेत. ते जे इष्टापूर्तदत्त इत्यादि कृतच उपासितात ते चांद्रमस लोकालाच संपादन करितात आणि तेच पुनरावर्तन करितात–पुनः जन्म घेतात. म्हणून हे प्रजेची इच्छा करणारे ऋषी दक्षिण मार्गास प्राप्त होतात. जो पितृयाण मार्ग तोच रयि होय. ९.

**भाष्यं--यश्चासौ चन्द्रमा मूर्तिरन्नममूर्तिश्च प्राणोऽत्ताऽऽदित्यस्तदेकमेतन्मिथुनं सर्वं कथं प्रजाः करिष्यत इति । उच्यते–तदेव कालः संवत्सरो वै प्रजापतिस्तन्निर्वर्त्यत्वात्संवत्सरस्य । चन्द्रादित्यनिर्वर्त्यतिथ्यहोरात्रसमुदायो हि संवत्सरस्तदनन्यत्वाद्रयिप्राणमिथुनात्मक एवेत्युच्यते । तत्कथम् । तस्य संवत्सरस्य प्रजापतेरयने मार्गौ द्वौ दक्षिणं चोत्तरं च । द्वे प्रसिद्धे ह्ययने षण्मासलक्षणे याभ्यां दक्षिणेनोत्तरेण च याति सविता केवलकर्मिणां ज्ञानसंयुक्तकर्मवतां च लोकान्विदधत् ॥**

**भाष्यार्थ**—हा जो चंद्रमा–मूर्ति, अन्न व अमूर्ति प्राण, अत्ता, आदित्य, तें हें सर्व एक मिथुन आहे, पण तें प्रजेला कसें करितें, तें सांगितलें जातें–तें मिथुनच संवत्सर काल–प्रजापति आहे, कारण त्या संवत्सराला प्रजापतिरूप मिथुन निर्माण करीत असतें. ( चंद्राच्या योगानें तिथि होतात व सूर्याच्या योगानें अहोरात्र होतात ) आणि चंद्र व आदित्य यांच्या योगानें होणाऱ्या तिथि व अहोरात्र यांचा समुदाय म्हणजेच संवत्सर. ( कार्य व कारण हीं दोन पृथक् तत्त्वें नसून त्यांचें अनन्यत्व-ऐक्य अभेद असतो, असा न्याय आहे. यास्तव ) तदनन्य असल्यामुळें–तद्भिन्न नसल्यामुळें संवत्सर रयि-प्राण-मिथुनात्मकच आहे, असें म्हटलें जातें. ( चंद्र व आदित्य तिथ्यादिकांच्या द्वाराच संवत्सराला करितात, असें नाहीं; तर दोन अयनांच्या द्वाराहि त्याला करितात, असें सांगतात–)=तें कसें, म्हणून विचाराल तर सांगतों–त्या संवत्सरात्मक प्रजापतीचीं दोन अयनें–मार्ग आहेत. एक दक्षिण व दुसरें उत्तर. हीं षण्मासलक्षण दोन अयनें प्रसिद्धच आहेत. सविता केवल कर्मठांस त्यांचे लोक देत त्यांतील दक्षिण मार्गानें जातो आणि उपासनायुक्त कर्मठांस त्यांचे लोक देत उत्तर मार्गानें जातो. ( सूर्याप्रमाणें चंद्रहि दक्षिणोत्तर मार्गानें जातो. कारण ज्येष्ठादि–ज्येष्ठापासून दक्षिणायन व मार्गशीर्षादि उत्तरायण, असें श्रुतिवचन आहे. सारांश कर्मठांना त्यांचे उचित लोक देण्याकरितां चंद्र-सूर्य दक्षिणोत्तर मार्गानें जात असल्यामुळें आणि त्या निमित्तानेंच दोन अयनांची प्रसिद्धि झालेली असल्या कारणानें चंद्र-सूर्य अयनकर्ते आहेत व त्या अयनांच्या द्वाराच त्या चंद्रसूर्यांना संवत्सरकर्तृत्वहि आहे. )

**भाष्यं--कथं । तत्–तत्र च ब्राह्मणादिषु ये ह वै तदुपासत इति क्रियाविशेषणो द्वितीयस्तच्छब्दः । इष्टं च पूर्तं चेष्टापूर्ते इत्यादि कृतमेवोपासते नाकृतं नित्यं ते चान्द्रमसं चन्द्रमसि भवं प्रजापतेर्मिथुनात्मकस्यांशं रयिमन्नभूतं लोकमभिजयन्ते कृतरूपत्वाच्चान्द्रमसस्य । ते तत्रैव च कृतक्षयात्पुनरावर्तन्त ‘ इमं लोकं हीनतरं वा विशन्तीति ’ ह्युक्तम् ॥**

**भाष्यार्थ**--पण चंद्र-सूर्यांना लोकविधायकच कसें?(ते कर्मठांना त्यांच्या केवल कर्मांच्या अथवा उपासनायुक्त कर्मांच्या अनुरोधानें फलभूत लोक कसे देतात? म्हणून विचाराल तर सांगतों-)=त्या ब्राह्मणादि प्रजेंतील जे ('तद्ये ह वै तदुपासते' यांतील 'तदुपासते' हा दुसरा तत्-शब्द क्रियाविशेषण आहे.) इष्टापूर्त-इत्यादि कृताचेंच-कार्याचेंच अनुष्ठान करितात, नित्य अकृताचें-अकार्याचें अनुष्ठान करीत नाहींत, ते नित्य चांद्रमस लोकासच प्राप्त होतात. (अग्निहोत्र, तप, सत्य, वेदांचें अध्ययनादिकांच्या योगानें पालन, आतिथ्य व वैश्वदेव, याला इष्ट; वापी-कूप-तडागादि जलाशय तयार करून त्यांचा लोकोपयोगार्थ उत्सर्ग करणें, देवालयें बांधणें, अन्नदान करणें, बागा करणें, इत्यादि जीवांची साक्षात् तृप्ति करणाऱ्या कर्मास पूर्त व दानास दत्त असें म्हणतात.)='चांद्रमसं०' म्हणजे चंद्रामध्यें झालेल्या मिथुनात्मक प्रजापतीच्या अंशास, अन्नभूत रयीस कारण तो चांद्रमस अन्नभूत लोक कार्यरूप आहे. असो; पुढें तेथेंच कृत कर्मांचा क्षय झाल्यामुळें ते पुन: आवृत्त होतात. 'या मनुष्य लोकांत किंवा याहून अधिक हीन (पश्वादि) लोकांत प्रवेश करितात' असें मुंडकांत मंत्रानें सांगितलेंच आहे. (कृताचें अनुष्ठान हेंच पुनरावृत्तीचें कारण. कृतरूप इष्टादिकांपासून होणाऱ्या चंद्रालाहि कृतत्व असल्यामुळें अनित्यत्व असतें व त्यामुळेंच पुनरावृत्ति होते.)

**भाष्यं—यस्मादेवं प्रजापतिमन्नात्मकं फलत्वेनाभिनिर्वर्तयन्ति चन्द्रमिष्टापूर्तकर्मणैत ऋषय: स्वर्गद्रष्टार: प्रजाकामा: प्रजार्थिनो गृहस्थास्तस्मात्स्वकृतमेव दाक्षिणं दक्षिणायनोपलक्षितं चन्द्रं प्रतिपद्यन्ते । एष ह वै रयिरन्नं य: पितृयाण: पितृयाणोपलक्षितश्चन्द्र: ॥ ९ ॥**

**भाष्यार्थ**--ज्याअर्थी अशाप्रकारें हे 'ऋषय:'-स्वर्गद्रष्टे, 'प्रजाकामा:'-प्रजेची इच्छा करणारे गृहस्थ अन्नात्मक प्रजापतीस म्हणजे चंद्रास इष्टापूर्त कर्मांच्या योगानें फलरूपानें निर्माण करितात, त्याअर्थी ते स्वकृतच दक्षिणायनास म्हणजे दक्षिणायनावरून उपलक्षित होणाऱ्या चंद्रास प्राप्त होतात. हा जो प्रसिद्ध पितृयाण, पितृयाणोपलक्षित चंद्र, तोच रयि-अन्न आहे. ९.

**श्रुति:—अथोत्तरेण तपसा ब्रह्मचर्येण श्रद्धया विद्ययाऽऽत्मानमन्विष्याऽऽदित्यमभिजयन्ते । एतद्वै प्राणानामायतनमेतदमृतमभयमेतत्परायणमेतस्मान्न पुनरावर्तन्त इत्येष निरोधस्तदेष श्लोक: ॥ १० ॥**

**अर्थ**—आतां इंद्रियविजय, ब्रह्मचर्य, श्रद्धा व उपासना यांच्यायोगानें आत्म्याला 'तोच मी' असें जाणून उत्तरमार्गानें आदित्याला प्राप्त होतात. तेंच प्राणांचें आयतन,

तेंच अमृत, अभय, हीच परा गति, यापासून प्रजा पुनरावृत्त होत नाहींत, हा निरोध आहे. या अर्थी हा मंत्र आहे. १०.

**भाष्यं—अथोत्तरेणायनेन प्रजापतेरंशं प्राणमत्तारमादित्यमभिजयन्ते। केन। तपसेन्द्रियजयेन विशेषतो ब्रह्मचर्येण श्रद्धया विद्यया च प्रजापत्यात्मविषययाऽऽत्मानं प्राणं सूर्यं जगतस्तस्थुषश्चान्विष्याहमस्मीति विदित्वाऽऽदित्यमभिजयन्तेऽभिप्राप्नुवन्ति ॥**

**भाष्यार्थ**—'अथ'—श्रुति आतां दुसऱ्या मार्गाचें वर्णन आरंभिते. (ब्राह्मणादिकांतील प्रजा)='उत्तरेण०'—उत्तर अयनानें प्रजापतीचा अंश जो प्राण, अत्ता, आदित्य त्यास प्राप्त होतात (सर्व प्रकारें जिंकतात.)=कोणत्या उपायानें? (म्हणून विचाराल तर सांगतों-)='तपसा०'—इंद्रियजयानें, विशेषतः ब्रह्मचर्यानें, श्रद्धेनें व 'विद्यया'—प्रजापतितादात्म्यविषयक—प्रजापतीच मी आहें, अशा प्रकारच्या उपासनेनें, आत्म्याला म्हणजे स्थावर-जंगमाच्या प्राणाला—सूर्याला 'हा मी आहें' असें जाणून आदित्यास सर्व प्रकारें प्राप्त होतात.

**भाष्यं—एतद्वा आयतनं सर्वप्राणानां सामान्यमायतनमाश्रयमेतदमृतमविनाशि। अभयमत एव भयवर्जितं न चन्द्रवत्क्षयवृद्धिभयवत्। एतत्परायणं परा गतिर्विद्यावतां कर्मिणां च ज्ञानवताम्। एतस्मान्न पुनरावर्तन्ते यथेतरे केवलकर्मिण इति। यस्मादेषोऽविदुषां निरोधः। आदित्याद्धि निरुद्धा अविद्वांसो नैते संवत्सरमादित्यमात्मानं प्राणमभिप्राप्नुवन्ति। स हि संवत्सरः कालात्माऽविदुषां निरोधः। तत्तत्रास्मिन्नर्थ एष श्लोको मन्त्रः॥ १०॥**

**भाष्यार्थ**—'एतद्वै प्राणानां आयतनं'—हें (सूर्यरूप) च सर्व प्राणांचें सामान्य (समष्टिरूप) आयतन—आश्रय आहे. हेंच अमृत—अविनाशि व म्हणूनच हें 'अभयं'—भयरहित आहे. चंद्राप्रमाणें याला क्षयाची व वृद्धीची भीति नाहीं. 'एतत्परायणं०'—(कर्माचा अधिकार नसल्यामुळें) केवल उपासना करणाऱ्या संन्यासि-प्रभृतींची व उपासनेसह कर्मानुष्ठान करणाऱ्या लोकांची ही परा गति आहे. 'एतस्मान्न०'—जसे दुसरे केवल कर्म करणारे कर्मठ पुनः या लोकीं येऊन जन्म घेतात, त्याप्रमाणें ते आदित्यापासून पुनरावृत्त होत नाहींत. कारण 'एष निरोधः'—हा आदित्य उपासनाशून्य पुरुषांचा निरोध आहे. अविद्वान् आदित्यापासूनच निरुद्ध झालेले असतात. यास्तव ते संवत्सरात्मक आदित्यास म्हणजे आत्म्यास, प्राणास सर्व प्रकारें प्राप्त होत नाहींत. यास्तव तो कालात्मा संवत्सर अविद्वानांचा निरोध आहे. [निरोध म्हणजे प्रतिबंध.]='तदेष श्लोकः०'—याच अर्थी हा पुढील मंत्र आहे. १०.

**श्रुतिः—पञ्चपादं पितरं द्वादशाकृतिं दिव आहुः परे अर्धे पुरीषिणम्।**
**अथेमे अन्य उ परे विचक्षणं सप्तचक्रे षडर आहुरर्पितमिति॥११॥**

**अर्थ**—कालवेत्ते याला पञ्चपाद, पिता, द्वादशाकृति, व द्युलोकाहून वरील स्थानांत उदकवान् असें म्हणतात, दुसरे कालवेत्ते त्या विचक्षण–निपुण सर्वज्ञाला हें सर्व जगत् सप्त अश्वरूपानें व सहा अरांनीं युक्त असलेल्या चक्रांत–कालात्म्यामध्यें अर्पिलेलें आहे, असें म्हणतात. [ म्हणजे त्या सप्तचक्रात्मक सर्वज्ञांत सर्व जगत् अर्पिलेलें आहे, असें म्हणतात. ] ११.

**भाष्यं—पञ्चपादं पञ्चर्तवः पादा इवास्य संवत्सरात्मन आदित्यस्य तैरसौ पादैरिवर्तुभिरावर्तते। हेमन्तशिशिरावेकीकृत्येयं कल्पना। पितरं सर्वस्य जनयितृत्वात्पितृत्वं तस्य। तं द्वादशाकृतिं द्वादश मासा आकृतयोऽवयवा आकरणं वाऽवयविकरणमस्य द्वादशमासैस्तं द्वादशाकृतिं दिवो द्युलोकात्पर ऊर्ध्वेऽर्धे स्थाने तृतीयस्यां दिवीत्यर्थः। पुरीषिणं पुरीषवन्तमुदकवन्तमाहुः कालविदः॥**

**भाष्यार्थ**—'पञ्चपादं'–पांच ऋतू हे या संवत्सरात्मक आदित्याचें जणु काय पाय आहेत. त्या ऋतूंच्या योगानें जणु काय पायांप्रमाणेंच आदित्य आवर्तन (पुनः पुनः संचार) करीत असतो. हेमंत व शिशिर या दोन ऋतूंना एक समजून ही पांच पादांची कल्पना केली आहे. 'पितरं'–तसाच तो पिता आहे. सर्व वस्तूंचें उत्पादकत्व असल्यामुळें त्याला सर्वांचें पितृत्व आहे. 'द्वादशाकृतिम्'–बारा मास हेच त्याचे 'आकृति'–अवयव आहेत; अथवा बारा मासांनीं ज्याला अवयवी केलें आहे तो द्वादशाकृति [ दोन्ही पक्षीं अर्थ एकच ]; त्याचप्रमाणें आकाशरूप अंतरिक्ष लोकाच्या वरील स्थानीं, म्हणजे तिसऱ्या स्वर्गांत असा याचा अर्थ; 'पुरीषिणम्'–पुरीषवान् म्हणजे उदकवान् आहे, असें कालवेत्ते म्हणतात. आदित्यापासून वृष्टि होत असल्यामुळें त्याला उदकवान् म्हणतात. [ अर्थात् कालज्ञ त्याला पंचपाद, पिता, द्वादशाकृति व पुरीषिण म्हणतात. ]

**भाष्यं—अथ तमेवान्य इम उ परे कालविदो विचक्षणं निपुणं सर्वज्ञं सप्तचक्रे सप्तहयरूपेण चक्रे सततं गतिमति कालात्मनि षडरे षडृतुमत्याहुः सर्वमिदं जगत्कथयन्ति। अर्पितमरा इव रथनाभौ निविष्टमिति॥**

**भाष्यार्थ**—'अथ तमेव०'–पण त्यालाच दुसरे कालज्ञ 'विचक्षण'–निपुण, सर्वज्ञ, म्हणतात. सतत गतिमान् अशा कालरूप, व सहा ऋतुरूपी अरांनीं युक्त अशा 'सप्तचक्रे षडरे०'–सात अश्वरूपानें चक्रामध्यें हें सर्व जगत् अर्पिलेलें आहे, असें सांगतात. [रथाच्या चाकाच्या नाभीमध्यें अर जसे ठोकून घट्ट बसविलेले असतात तसें हें जगत्

त्या निपुण, सप्ताश्वयुक्त, सदा गतिमान् व षड्ऋतुरूप कालचक्रांत घट्ट बसविलेलें आहे.]

**भाष्यं—यदि पञ्चपादो द्वादशाकृतिर्यदि वा सप्तचक्रः षडरः सर्वथाऽपि संवत्सरः कालात्मा प्रजापतिश्चन्द्रादित्यलक्षणोऽपि जगतः कारणम् ॥ ११ ॥**

**भाष्यार्थ**—( या मंत्रांत दोन मतें सांगितलीं आहेत. पहिल्या मतांत ऋतूंना पाय व मासांना अवयव म्हणून आदित्यरूपानें संवत्सर कालच सांगितला आणि दुसऱ्या मतांत हेमन्त व शिशिर या दोन ऋतूंस पृथक् मानून सहा ऋतू हे सहा अर आहेत अशी कल्पना केली व परिवर्तन–म्हणजे वारंवार फिरणें या गुणामुळें संवत्सराचे ठिकाणीं चक्रत्वाची कल्पना करून कालप्राधान्यानें व सर्वाश्रयत्वानें त्याचेंच ( संवत्स-राचेंच प्रतिपादन केलें. म्हणजे या दोन्ही पक्षीं गुण व कल्पना यांचा जरी भेद असला तरी धर्मीचा भेद नाहीं. सारांश–)=पंचपाद, द्वादशाकृति असो, कीं सप्तचक्र व षडर असो; कसाहि जरी असला तरी संवत्सरकालात्मा प्रजापति चंद्रादित्यरूप असूनहि जगाचें कारण आहे. ११.

**श्रुतिः—मासो वै प्रजापतिस्तस्य कृष्णपक्ष एव रयिः शुक्लः प्राणस्तस्मादेत ऋषयः शुक्ल इष्टं कुर्वन्तीतर इतरस्मिन् ॥ १२ ॥**

**अर्थ**—मासच प्रजापति आहे. त्याचा कृष्ण पक्षच रयि–अन्न व शुक्ल पक्ष प्राण –अत्ता आहे. तस्मात् हे प्राणदर्शी ऋषी शुक्लपक्षांत इष्ट करितात व इतर–प्राणाला न पाहणारे कृष्णपक्षांत इष्ट करितात. १२.

**भाष्यं—यस्मिन्निदं श्रितं विश्वं स एव प्रजापतिः संवत्सराख्यः स्वावयवे मासे कृत्स्नः परिसमाप्यते । मासो वै प्रजापतिर्यथोक्तलक्षण एव मिथुनात्मकः। तस्य मासात्मनः प्रजापतेरेको भागः कृष्णपक्षो रयिरन्नं चन्द्रमाः । अपरो भागः शुक्लपक्षः प्राण आदित्योऽत्ताऽग्निः । यस्माच्छुक्लपक्षात्मानं प्राणं सर्वमेव पश्यन्ति तस्मात्प्राणदर्शिन एत ऋषयः कृष्णपक्षेऽपीष्टं यागं कुर्वन्ति प्राणव्यतिरेकेण कृष्णपक्षस्तैर्न दृश्यते यस्मात् । इतरे तु प्राणं न पश्यन्तीत्यदर्शन-लक्षणं कृष्णात्मानमेव पश्यन्ति । इतर इतरस्मिन्कृष्णपक्ष एव कुर्वन्ति शुक्ले कुर्वन्तोऽपि ॥ १२ ॥**

**भाष्यार्थ**—ज्याच्या मध्यें हें विश्व आश्रित–आश्रय करून राहिलें आहे तोच संव-त्सराख्य प्रजापति आपल्या अवयवभूत मासामध्यें सर्व परिसमाप्त होतो. (तो मासरूप झाला आहे.)=‘मासो वै प्रजापतिः’–मासच यथोक्तलक्षण–संवत्सररूप, रयि-प्राणमिथुना-त्मक प्रजापति आहे. ‘ तस्य कृष्णपक्ष एव रयिः ’–त्या मासात्मक प्रजापतीचा एक भाग म्हणजे कृष्णपक्ष रयि, अन्न–चंद्रमा आहे आणि ‘ शुक्लः प्राणः ’–दुसरा

भाग शुक्ल पक्ष, प्राण, आदित्य–अत्ता–अग्नि आहे. ज्याअर्थी शुक्लपक्षरूप प्राणास सर्वात्मकच पाहतात व ज्याअर्थी ते कृष्णपक्षाला प्राणाहून पृथक् पहात नाहींत त्याअर्थी हे कृष्णपक्षांतहि इष्ट ( याग ) करणारे प्राणदर्शी ऋषी ती जणुंकाय शुक्लपेक्षांतच करितात. ( प्राण शुक्लपक्षात्मक आहे व कृष्णपक्षादि सर्व जगाला प्राणरूपत्व आहे. यास्तव प्राणाच्या द्वारा कृष्णपक्षालाहि शुक्लपक्षत्व प्राप्त झालें असतां ते प्राणदर्शी ऋषी कृष्णपक्षांत जरी याग करीत असले तरी तो प्रकाशात्मक शुक्लपक्षांतच केल्यासारखा होतो. शुक्लपक्षाला प्राण समजणें, या उपासनेची ही स्तुति आहे. ) =' इतर इतरस्मिन् '–परंतु दुसरे ऋषी सर्वात्मक प्राणास पहात नाहींत. त्यामुळें ते अज्ञानात्मक कृष्णपक्षालाच पाहतात. यास्तव ते वस्तुतः शुक्लपक्षांत जरी याग करीत असले तरी तो कृष्णपक्षांतच केल्यासारखा होतो. १२

**श्रुतिः—अहोरात्रो वै प्रजापतिस्तस्याहरेव प्राणो रात्रिरेव रयिः प्राणं वा एते प्रस्कन्दन्ति ये दिवा रत्या संयुज्यन्ते ब्रह्मचर्यमेव तद्यद्रात्रौ रत्या संयुज्यन्ते ॥ १३ ॥**

**अर्थ**—अहोरात्र हाच प्रजापति आहे. त्याचा दिवस हाच प्राण–अत्ता व रात्रिच रयि–अन्न आहे. जे दिवसा रतिकारणभूत स्त्रीशीं संयुक्त होतात ते प्राणांचाच विनाश करितात. पण जो रात्रीं स्त्रीशीं संबंध केला जातो तें ब्रह्मचर्यच होय. १३.

**भाष्यं—सोऽपि मासात्मा प्रजापतिः स्वावयवेऽहोरात्रे परिसमाप्यते । पूर्ववत् । तस्याप्यहरेव प्राणोऽत्ताऽग्नी रात्रिरेव रयिः पूर्ववत् । प्राणमहरात्मानं वा एते प्रस्कन्दन्ति निर्गमयन्ति शोषयन्ति वा स्वात्मनो विच्छिद्यापनयन्ति । के । ये दिवाऽहनि रत्या रतिकारणभूतया सह स्त्रिया संयुज्यन्ते मिथुनं मैथुनमाचरन्ति मूढाः । यत एवं तस्मात्तन्न कर्तव्यमिति प्रतिषेधः प्रासङ्गिकः । यद्रात्रौ संयुज्यन्ते रत्या ऋतौ ब्रह्मचर्यमेव तदिति प्रशस्तत्वादृतौ भार्यागमनं कर्तव्यमिति । अयमपि प्रासङ्गिको विधिः । प्रकृतं तूच्यते । सोऽहोरात्रात्मकः प्रजापतिर्व्रीहियवाद्यन्नात्मना व्यवस्थितः ॥ १३ ॥**

**भाष्यार्थ**—' अहोरात्रो० '–तोहि मासरूप प्रजापति पूर्वीप्रमाणें आपल्या अवयवरूप अहोरात्रांत परिसमाप्त होतो. ( अहोरात्ररूप होतो. ) त्याचाहि दिवस हा प्राण, अत्ता, अग्नि व रात्रच रयि, पूर्वीप्रमाणें अन्न, चंद्रमा आहे. 'प्राणं वा एते प्रस्कन्दन्ति' –ते दिवसात्मक प्राणालाच घालवितात, शुष्क करितात; स्वात्म्यापासून त्याचा संबंध तोडून त्याला दूर करितात. कोण ? ' ये दिवा० '–जे मूढ दिवसा रतिकारणभूत स्त्रीशीं

संयुक्त होतात—मैथुन करितात ते. ज्याअर्थी असें आहे त्याअर्थी दिवसा मैथुन करूं नये, हा प्रासंगिक प्रतिषेध (निषेध) आहे. ' यद्रात्रौ रत्या संयुज्यन्ते तद्ब्रह्मचर्यमेव ' -परंतु ऋतुसमयीं रात्रौ जो स्त्रीसंयोग केला जातो तें ब्रह्मचर्यच होय, असें म्हणून ऋतुसमयीं रात्रौ स्त्रीगमनाची प्रशंसा केलेली असल्यामुळें तें करावें; हाहि प्रासंगिकच विधि आहे. [ कारण हें प्रकरण विधि-निषेधबोधक नाहीं. ]=आतां प्रकृत—जें प्रकरण चालू आहे तेंच सांगितलें जातें—तो अहोरात्रात्मक प्रजापति व्रीहि-यव इत्यादि अन्नरूपानें व्यवस्थित आहे. १३

**श्रुतिः-अन्नं वै प्रजापतिस्ततो ह वै तद्रेतस्तस्मादिमाः प्रजाः प्रजायन्त इति ॥**

**अर्थ**-अन्नच प्रजापति आहे. त्यापासून रेत व त्यापासून या सर्व प्रजा उत्पन्न होतात. १४.

**भाष्यं--एवं क्रमेण परिणम्य तदन्नं वै प्रजापतिः । कथम् । ततस्तस्माद्ध वै रेतो नृबीजं तत्प्रजाकारणं तस्माद्योषिति सिक्तादिमा मनुष्यादिलक्षणाः प्रजाः प्रजायन्ते । यत्पृष्टं कुतो ह वै प्रजाः प्रजायन्त इति । तदेवं चन्द्रादित्यमिथुनादिक्रमेणाहोरात्रान्तेनान्नासृग्रेतोद्वारेणेमाः प्रजाः प्रजायन्त इति निर्णीतम् ॥१४॥**

**भाष्यार्थ**—' अन्नं वै प्रजापतिः '—रयि-प्राण-संवत्सर इत्यादि क्रमानें परिणाम पावून तो प्रजापति धान्यस्वरूपानें ( अन्नरूपानें ) होऊन राहिला. पण अन्नरूप झालेल्याहि त्याला प्रजेचें जनकत्व ( उत्पादकत्व ) कसें ? म्हणून विचाराल तर सांगतों— ' ततो ह वै तद्रेतः '—भक्षण केलेल्या त्या अन्नापासून रेत झालें ( रेतशब्दानें स्त्री-शरीरांतील शोणितनांवाचा सातवा धातुहि घ्यावा. )=रेत म्हणजे नृबीज (नरांचें बीज, जरायुज व अंडज प्राण्याच्या शरीरांचें बीज ), तें प्रजेचें कारण आहे. ' तस्मादिमाः प्रजाः०'—स्त्रीच्या ठिकाणीं सेचन केलेल्या त्या बीजापासून या मनुष्यादिलक्षण प्रजा उत्पन्न होतात. कबंधी कात्यायनानें ह्या सर्व प्रजा कोणापासून उत्पन्न होतात, असा जो प्रश्न केला होता त्याचा—चंद्रादित्यांच्या मिथुनापासून अहोरात्रापर्यंत वर सांगितलेल्या क्रमानें अन्न, शोणित, रेत यांच्या द्वारा या प्रजा निर्माण होतात, असा निर्णय केला आहे. १४.

**श्रुतिः—तद्ये ह वै तत्प्रजापतिव्रतं चरन्ति ते मिथुनमुत्पादयन्ते । तेषामेवैष ब्रह्मलोको येषां तपो ब्रह्मचर्यं येषु सत्यं प्रतिष्ठितम् ॥ १५ ॥**

**अर्थ**--ते जे गृहस्थ तें प्रजापतिव्रत करितात ते कन्यापुत्ररूप मिथुनाला उत्पन्न करितात. त्यांनाच हा ब्रह्मलोक मिळतो कीं ज्यांचें तप व ब्रह्मचर्य असतें व ज्यांच्यामध्यें सत्य प्रतिष्ठित असतें. १५.

**भाष्यं--तत्तत्रैवं सति ये गृहस्थाः 'ह वै' इति प्रसिद्धस्मरणार्थौ निपातौ। तत्प्रजापतेर्व्रतमृतौ भार्यागमनं चरन्ति कुर्वन्ति तेषां दृष्टफलमिदम्। किम्। ते मिथुनं पुत्रं दुहितरं चोत्पादयन्ते। अदृष्टं च फलमिष्टापूर्तदत्तकारिणां तेषामेवैष यश्चान्द्रमसो ब्रह्मलोकः पितृयाणलक्षणो येषां तपः स्नातकव्रतादीनि। ब्रह्मचर्यम्। ऋतावन्यत्र मैथुनासमाचरणं ब्रह्मचर्यम्। येषु च सत्यमनृतवर्जनं प्रतिष्ठितमव्यभिचारितया वर्तते नित्यमेव ॥ १५ ॥**

**भाष्यार्थ**—' तद्ये ह वै ' अशी वस्तुस्थिति असल्यामुळें जे गृहस्थ; ' ह वै ' हे प्रसिद्धस्मरणार्थ निपात आहेत. ' तत्प्रजापतिव्रतं चरन्ति '–ऋतुकालीं भार्यागमनरूप प्रजापतीचें व्रत करितात त्यांना हें दृष्टफल मिळतें. तें कोणतें? ते पुत्र व कन्या या मिथुनास ( जोडप्यास ) उत्पन्न करितात. (पण केवल हें प्रजापतिव्रत केल्यानेंच चंद्रलोकप्राप्तिरूप अदृष्ट फल मिळत नाहीं. कारण तेवढ्यानेंच तें मिळतें असें समजल्यास मूर्खांना व पश्वादिकांनाहि तें मिळण्याचा प्रसंग येईल. कारण तेहि ऋतुकालीं स्त्रीसमागम करून मिथुन उत्पन्न करितात. यास्तव )=' तेषामेवैषो ब्रह्मलोकः '–त्या ऋतुकालीं भार्यागमन करणाऱ्या गृहस्थांतील जे इष्टापूर्तदत्तकारी ( इष्टादि करणारे ) असतात त्यांनाच, हा पितृयाणलक्षण चांद्रमस ब्रह्मलोक हें अदृष्ट फल मिळतें. ( इष्टादि कर्में करणाऱ्या गृहस्थांना प्रजापतीच्या अंशरूप चांद्रमस लोकाची प्राप्ति होण्याकरितां तप, ब्रह्मचर्य व सत्य यांचीहि अपेक्षा असते असें आतां श्रुतिच सांगते–)=' येषां तपः०'–ज्या गृहस्थांमध्यें स्नातकव्रतादि तप, ऋतुकालाला सोडून इतर समयीं मैथुन न करणें, हें ब्रह्मचर्य असतें व ज्यांच्यामध्यें मिथ्यात्याग, हें सत्य सतत प्रतिष्ठित झालेलें असतें [ क्षणभरहि व्यभिचार न पावतां, स्थिर राहतें त्यांनाच हें वरील अदृष्ट फल मिळतें.] १५.

**श्रुतिः—तेषामसौ विरजो ब्रह्मलोको न येषु जिह्ममनृतं न माया चेति॥१६॥**

**इत्यथर्ववेदीयप्रश्नोपनिषदि प्रथमः प्रश्नः॥ १ ॥**

**अर्थ**—त्यांनाच हा शुद्ध ब्रह्मलोक मिळतो कीं ज्यांच्यामध्यें कौटिल्य व अनृत नाहीं व ज्यांच्यामध्यें माया नाहीं. १६.

**भाष्यं—यस्तु पुनरादित्योपलक्षित उत्तरायणः प्राणात्मभावो विरजः शुद्धो न चन्द्रब्रह्मलोकवद्रजस्वलो वृद्धिक्षयादियुक्तोऽसौ केषां तेषामित्युच्यते। यथा गृहस्थानामनेकविरुद्धसंव्यवहारप्रयोजनवत्त्वाज्जिह्मं कौटिल्यं वक्रभावोऽवश्यंभावि तथा न येषु जिह्मम्। यथा च गृहस्थानां क्रीडानर्मादिनिमित्तमनृतमवर्जनीयं तथा न येषु तत्। तथा माया गृहस्थानामिव न येषु विद्यते। माया नाम बहिरन्यथाऽऽत्मानं प्रकाश्यान्यथैव कार्यं करोति सा माया**

**मिथ्याचाररूपा । मायेत्येवमादयो दोषा येष्वधिकारिषु ब्रह्मचारिवानप्रस्थभिक्षुषु निमित्ताभावान्न विद्यन्ते तत्साधनानुरूपेणैव तेषामसौ विरजो ब्रह्मलोक इत्येषा ज्ञानयुक्तकर्मवतां गतिः । पूर्वोक्तस्तु ब्रह्मलोकः केवलकर्मिणां चन्द्रलक्षण इति ॥ १६ ॥**

**इति श्रीमत्परमहंसपरिव्राजकाचार्यश्रीमद्गोविन्दभगवत्पूज्यपादशिष्य-श्रीमच्छंकरभगवतः कृतौ प्रश्नोपनिषद्भाष्ये प्रथमः प्रश्नः ॥ १ ॥**

**भाष्यार्थ**—'तेषामसौ०'—पण हा जो दुसरा आदित्योपलक्षित, शुद्ध, वरील चंद्रब्रह्मलोकाप्रमाणें रजस्वल (मलिन) वृद्धि-क्षयादियुक्त नसलेला उत्तरायणसंज्ञक प्राणात्मभाव तो त्या प्रजेंतील कोणाला प्राप्त होतो, तें सांगितलें जातें- गृहस्थांना अनेक विरुद्ध संव्यवहार करण्याचें प्रयोजन (कारण) असल्यामुळें कौटिल्य (वक्रभाव) जसें अवश्य करावें लागतें 'न येषां जिह्ममनृतं'—तसें कौटिल्य (जिह्म) ज्यांच्यामध्यें नसतें, त्याचप्रमाणें गृहस्थांना क्रीडा, नर्म—थट्टा—मस्करी इत्यादि निमित्तानें बोलावें लागणारें असत्य जसें टाळतां येत नाहीं व त्यामुळें ते जसें असत्य बोलतात तसें अनृत ज्यांच्यामध्यें नसतें, तशीच गृहस्थांप्रमाणें ज्यांच्यामध्यें 'न माया'—माया नसते (त्यांनाच हा विरज—शुद्ध ब्रह्मलोक प्राप्त होतो.) बाहेर आपलें स्वरूप निराळेंच दाखवून कार्य निराळेंच करावयाचें, याला माया (कपट) म्हणतात. अर्थात् ती मिथ्या आचाररूप असते. असो; ब्रह्मचारी, वानप्रस्थ, व परमहंसास सोडून बाकीचे भिक्षु इत्यादि ज्या अधिकारी पुरुषांमध्यें, कौटिल्यादिकांचें कांहीं निमित्तच नसल्यामुळें कौटिल्य, अनृत व माया हे दोष नसतात त्यांना, त्यांच्या साधनानुसारच, हा विरज (शुद्ध) ब्रह्मलोक मिळतो. ही ज्ञानयुक्त—उपासनायुक्त—कर्मवानांची गति आहे. वरच्या मंत्रांत सांगितलेला जो चंद्रलक्षण ब्रह्मलोक तो केवल कर्मठांस मिळतो. (व हा उपासनायुक्त कर्मवानास मिळतो). १६.

इति प्रश्नोपनिषद्भाष्यार्थाचा प्रथम प्रश्न समाप्त.

---

# अथ द्वितीयः प्रश्नः ।

**श्रुतिः—अथ हैनं भार्गवो वैदर्भिः पप्रच्छ । भगवन्कत्येव देवाः प्रजां विधारयन्ते कतर एतत्प्रकाशयन्ते कः पुनरेषां वरिष्ठ इति ॥ १ ॥**

**अर्थ**—त्यानंतर पिप्पलाद आचार्याला भार्गव वैदर्भि म्हणाला—"हे भगवन्, किती देव प्रजेचें विशेषतः धारण करितात. बुद्धीन्द्रिय-कर्मेन्द्रियरूप देवांतील कोणते देव हें प्रकाशन करितात; व यांतील वरिष्ठ कोण ?" १

**भाष्यं—प्राणोऽत्ता प्रजापतिरित्युक्तम् । तस्य प्रजापतित्वमत्तृत्वं चास्मिञ्शरीरेऽवधारयितव्यमित्ययं प्रश्न आरभ्यते । अथानन्तरं ह किलैनं भार्गवो वैदर्भिः पप्रच्छ । हे भगवन्कत्येव देवाः प्रजां शरीरलक्षणां विधारयन्ते विशेषेण धारयन्ते । कतरे बुद्धीन्द्रियकर्मेन्द्रियविभक्तानामेतत्प्रकाशनं स्वमाहात्म्यप्रख्यापनं प्रकाशयन्ते । कोऽसौ पुनरेषां वरिष्ठः प्रधानः कार्यकरणलक्षणानामिति ॥ १ ॥**

**भाष्यार्थ**—प्राण अत्ता प्रजापति आहे, असें पहिल्या प्रश्नांत सांगितलें. आतां तें त्याचें प्रजापतित्व व अत्तृत्व या शरीरांत निश्चित करावें, म्हणून हा प्रश्न आरंभिला जातो. ( पूर्व प्रश्नांतील दोन गति ऐकून त्यांविषयीं विरक्त पुरुषालाहि चित्तैकाग्र्यावांचून पुढें सांगितलेलें आत्मज्ञान होत नाहीं; यास्तव तें सिद्ध होण्याकरितां व मंद उपासकांना विशेष फल मिळावें म्हणून प्राणोपासनेचें विधान करण्यास्तव या पुढील दोन प्रश्न आरंभिलेले आहेत. त्यांतल्यात्यांत श्रेष्ठत्व, अत्तृत्व, प्रजापतित्व इत्यादि गुणांचा निश्चय करण्यासाठीं दुसरा प्रश्न व त्याच्या उपपत्त्यादिकांचें निर्धारण करून त्याच्या उपासनेचें साक्षात् विधान करण्याकरितां तिसरा प्रश्न आहे. )=‘ अथ हैनं० ’—कबंधीच्या प्रश्नाचा निर्णय झाल्यानंतर पांचवा मुनि भार्गव वैदर्भि आचार्यास असें विचारता झाला—‘ भगवन्कत्येव० ’—हे भगवन्, किती देव या शरीरलक्षण प्रजेला विशेषेंकरून धारण करितात. ‘ कतरे एतत्० ’—ज्ञानेन्द्रियें, कर्मेन्द्रियें इत्यादि प्रकारांनीं भिन्न असलेल्या यांतील कोणते देव हें प्रकाशन—स्वमाहात्म्य प्रख्यापन—करून दाखवितात. ( अवकाश देणें इत्यादि आकाशादिकांचें माहात्म्य आहे. तेव्हां आकाशादिकांतील कोणते देव आपापलें कार्य सर्व लोकांत प्रकट होईल असें करितात ! ) =‘ कः पुनरेषां वरिष्ठः’—या कार्य-करणलक्षण देवांतील वरिष्ठ—प्रधान देव कोण ? १

**श्रुतिः—तस्मै स होवाचाऽऽकाशो ह वा एष देवो वायुरग्निरापः पृथिवी वाङ्मनश्चक्षुः श्रोत्रं च । ते प्रकाश्याभिवदन्ति वयमेतद्बाणमवष्टभ्य विधारयामः ॥ २ ॥**

**अर्थ**—तेव्हां त्याला तो आचार्य म्हणाला—“ आकाशच हा देव आहे. वायु, अग्नि, आप, पृथिवी, वाक्, मन, चक्षु व श्रोत्र हे देव आहेत. ते देव आपलें माहात्म्य प्रकाशित करून स्पर्धेनें म्हणतात, आम्हीच हें शरीर, त्याला सर्वतः आधार देऊन, धारण करितों. ” २.

**भाष्यं—एवं पृष्टवते तस्मै स होवाच । आकाशो ह वा एष देवो वायुरग्निरापः पृथिवीत्येतानि पञ्च महाभूतानि शरीरारम्भकाणि वाङ्मनश्चक्षुः-**

**श्रोत्रमित्यादीनि कर्मेन्द्रियबुद्धीन्द्रियाणि । ते कार्यलक्षणाः करणलक्षणाश्च । ते देवा आत्मनो माहात्म्यं प्रकाश्याभिवदन्ति स्पर्धमाना अहं श्रेष्ठतायै । कथं वदन्ति । वयमेतद्बाणं कार्यकरणसंघातमवष्टभ्य प्रासादमिव स्तम्भादयोऽवि-शिथिलीकृत्य विधारयामो विस्पष्टं धारयामः । मयैवैकेनायं संघातो ध्रियत इत्येकैकस्याभिप्रायः ॥ २ ॥**

**भाष्यार्थ**--' तस्मै स होवाच '–असें विचारणाऱ्या त्याला तो पिप्पलाद आचार्य म्हणाला–' आकाशो ह वा एष देवः '–तो प्रसिद्ध देव हा आकाशच आहे. ( आकाशशब्द पुल्लिंगीहि आहे. ) आकाश, वायु, अग्नि, जल व पृथिवी हीं पांच शरीरारंभक ( शरीराचा आरंभ करणारीं ) महाभूतें व वाक्, मन, चक्षु, श्रोत्र इत्यादि कर्मेंद्रियें व ज्ञानेंद्रियें हेच कार्यलक्षण व करणलक्षण देव आहेत. ( पुढें त्यांचा कलह सांगावयाचा आहे. म्हणून येथें चेतनत्वद्योतक देवशब्दाचा निर्देश केला आहे. शरीराकार परिणाम पावलेलीं आकाशादि भूतें हे कार्यलक्षण व द्विविध इंद्रियें हे करण-लक्षण देव होत. )=' ते प्रकाश्याभि० '–ते देव आपलें माहात्म्य प्रकट करून आपा-पल्या श्रेष्ठत्वाकारितां परस्पर स्पर्धा करीत बोलूं लागले. कसें ? स्तम्भादिक ( खांब वगैरे ) प्रासादाला ( मोठ्या धनिकाच्या किंवा राजाच्या वाड्याला ) जसे धारण करितात त्याप्रमाणें ' वयं '–आम्ही ' एतद्बाणं '–या कार्यकरणसंघातरूप शरीरास ' अवष्टभ्य '–चोहों-कडून आधार देऊन, त्याला फारसें शिथिल होऊं न देतां, ' विधारयामः '–उघड उघड धारण करितों. त्यांतील प्रत्येकाचा ' मीच एकटा या सर्व संघाताला धारण करितों ' असा अभिप्राय होता. ( त्या कार्यकरणरूप देवांतील प्रत्येकजण आपापलें कार्य लोकांत प्रकट करून सर्व शरीराचें धारण मीच करितों, असें अभिमानानें म्हणूं लागला. ) २.

**श्रुतिः--तान्वरिष्ठः प्राण उवाच । मा मोहमापद्यथाहमेवैतत्पञ्चधाऽऽत्मानं प्रविभज्यैतद्बाणमवष्टभ्य विधारयामीति तेऽश्रद्दधाना बभूवुः ॥३॥**

**अर्थ**--त्या सर्व देवांतील वरिष्ठ प्राण त्यांस म्हणाला–अविवेकानें असा अभि-मान करूं नका. मी आपल्याला पांच प्रकारें विभागून व या शरीराला आधार देऊन त्याचें धारण करितों. पण त्याच्या या भाषणावर ते देव विश्वास न ठेवणारे झाले. [ त्यांनीं त्याच्या म्हणण्यावर विश्वास ठेविला नाहीं. ] ३.

**भाष्यं--तानेवमभिमानवतो वरिष्ठो मुख्यः प्राण उवाचोक्तवान् । मा मैवं मोहमापद्यथाविवेकतयाऽभिमानं मा कुरुत यस्मादहमेवैतद्बाणमवष्टभ्य विधा-**

**रयामि पञ्चधाऽऽत्मानं प्रविभज्य प्राणादिवृत्तिभेदं स्वस्य कृत्वा विधारयामी-त्युक्तवति च तस्मिंस्तेऽश्रद्दधाना अप्रत्ययवन्तो बभूवुः कथमेतदेवमिति ॥३॥**

**भाष्यार्थ**--पण ' तान् '-अशा रीतीनें अभिमान करणाऱ्या त्या देवांना 'वरिष्ठः' -त्या सर्वांतील वरिष्ठ-मुख्य ' प्राण उवाच '-प्राण म्हणाला-' मा मोहमापद्यथ '-अविवेकामुळें अशा मोहांत पडूं नका. मूर्खपणामुळें असा अभिमान करूं नका. कारण ' अहमेवैतत्० '-मीच आपल्याला पांच प्रकारें विभागून-आपले प्राणापानादि वृत्तिभेद करून व या निंद्य गंधास वाहणाऱ्या आणि विनाश पावणाऱ्या शरीरास बळकटी देऊन धारण करितों. ' तेऽश्रद्दधाना बभूवुः '--पण तो असें म्हणूं लागला असतां ते इतर देव ' असें कसें होईल ' असें बोलून त्यावर विश्वास ठेवीनातसे झाले. ( प्राणाचें म्हणणें खरें आहे, असें त्यांना वाटलें नाहीं. त्याच्या म्हणण्यावर त्यांचा विश्वास बसला नाहीं. ते अश्रद्दधान-त्यावर श्रद्धा न ठेवणारे-झाले. ) ३.

**श्रुतिः**--**सोऽभिमानादूर्ध्वमुत्क्रमत इव तस्मिन्नुत्क्रामत्यथेतरे सर्व एवोत्क्रामन्ते तस्मिꣳश्च प्रतिष्ठमाने सर्व एव प्रातिष्ठन्ते। तद्यथा मक्षिका मधुकरराजानमुत्क्रामन्तं सर्वा एवोत्क्रामन्ते तस्मिꣳश्च प्रतिष्ठमाने सर्वा एव प्रातिष्ठन्त एवं वाङ्मनश्चक्षुःश्रोत्रं च ते प्रीताः प्राणं स्तुन्वन्ति ॥ ४ ॥**

**अर्थ**--म्हणून तो मुख्य प्राण अभिमानानें वर उत्क्रमणसा करूं लागला. पण तो असें उत्क्रमण करूं लागला असतां इतर सर्व प्राण उत्क्रमण करूं लागतात व तो प्रतिष्ठित झाला असतां सर्व प्रतिष्ठित होतात. म्हणजे व्यवहारांत ज्याप्रमाणें मधुकरांचा राजा उठून गेला असतां सर्वच मक्षिका उठून जातात व तो प्रतिष्ठित झाला असतां सर्वच प्रतिष्ठित होतात त्याप्रमाणें वाक्, मन, चक्षु, श्रोत्र इत्यादि इतर प्राण उत्क्रान्त व प्रतिष्ठित होतात. तेव्हां ते देव संतुष्ट होऊन प्राणाची स्तुति करितात. ( हा मुख्य प्राण म्हणतो तें खरें आहे, अशी त्यांची खात्री झाली असतां त्यांनीं त्याच्या म्हणण्यावर विश्वास ठेवून त्याची स्तुति केली. ) ४.

**भाष्यं -- स च प्राणस्तेषामश्रद्दधानतामालक्ष्याभिमानादूर्ध्वमुत्क्रमत इवेदमुत्क्रान्तवानिव सरोषान्निरपेक्षस्तस्मिन्नुत्क्रामति यद्वृत्तं तद्दृष्टान्तेन प्रत्यक्षी करोति। तस्मिन्नुत्क्रामति सत्यथानन्तरमेवेतरे सर्व एव प्राणाश्चक्षुरादय उत्क्रामन्त उच्चक्रमिरे। तस्मिंश्च प्राणे प्रतिष्ठमाने तूष्णीं भवत्यनुत्क्रामति सति सर्व एव प्रातिष्ठन्ते तूष्णीं व्यवस्थिता अभूवन्। तत्तत्र यथा लोके मक्षिका मधुकराः स्वराजानं मधुकरराजानमुत्क्रामन्तं प्रति सर्वा एवोत्क्रामन्ते तस्मिंश्च प्रतिष्ठ-**

**माने सर्वा एव प्रातिष्ठन्ते प्रतितिष्ठन्ति। यथाऽयं दृष्टान्त एवं वाङ्मनश्चक्षुः श्रोत्रं चेत्यादयस्त उत्सृज्याश्रद्दधानतां बुद्ध्वा प्राणमाहात्म्यं प्रीताः प्राणं स्तुन्वन्ति स्तुवन्ति ॥ ४ ॥**

**भाष्यार्थ**—' सः ' तो प्राण तेव्हां त्या देवांची ती अश्रद्दधानता [ अविश्वास ] पाहून ' अभिमानादूर्ध्वम्० '–अभिमानानें जणुं काय हें शरीर सोडून वर जाऊंसा लागला. पण क्रोधानें शरीर व त्यांतील देवता यांविषयीं निरपेक्ष होऊन [ आपल्या मागें यांचा नाश होईल, याची कांहींच चिंता न करितां अथवा स्वतः एकटाच ] तो प्राण वर जाऊं लागला असतां जें झालें तें श्रुति दृष्टान्तानें प्रत्यक्ष करून दाखविते. ' तस्मिन्नु० ' –तो प्राण वर जाऊं लागला असतां त्याच्या अनंतर क्षणींच चक्षुरादि इतर देवहि वर जावयास निघाले आणि प्राण प्रतिष्ठित होऊन मुकाट्यानें राहिला असतां, त्यानें आपलें उत्क्रमण [ शरीर सोडून जाण्याची क्रिया ] बंद केलें असतां, ते सर्व चक्षुरादि प्रतिष्ठित, तूष्णीं व्यवस्थित झाले. ' तद्यथा० '–त्याविषयीं दृष्टान्त–ज्याप्रमाणें लोकांत –व्यवहारांत मधुकर–मधमाशा आपला राजा एखाद्या स्थानावरून उठून जाऊं लागला असतां त्याच्या पाठीमागून सर्वच उत्क्रमण करितात व तो एके स्थानीं प्रतिष्ठित झाला असतां सर्व [ मधुकर ] तेथेंच तूष्णीं व्यवस्थित होतात, 'एवं'–त्याप्रमाणेंच म्हणजे या दृष्टान्ताप्रमाणेंच ' वाङ्मनः० '–वाक्, मन, चक्षु, श्रोत्र, इत्यादि इंद्रियांच्या सचेतन देवता आपली अश्रद्धालुता सोडून व प्राणमाहात्म्य जाणून संतुष्ट होऊन प्राणास स्तवूं लागतात. ४.

**श्रुतिः—एषोऽग्निस्तपत्येष सूर्य एष पर्जन्यो मघवानेष वायुरेष पृथिवी रयिर्देवः सदसच्चामृतं च यत् ॥ ५ ॥**

**अर्थ**—हा प्राण अग्नि होऊन संताप करितो. सूर्य होऊन प्रकाशमान होतो. हा पर्जन्य, इंद्र, हा वायु, हा देव पृथिवी, रयि–अन्न, सत्, असत् व जें अमृत तें आहे. ५.

**भाष्यं—कथम्। एष प्राणोऽग्निः संस्तपति ज्वलति। तथैष सूर्यः सन्प्रकाशते। तथैष पर्जन्यः सन्वर्षति। किंच मघवानिन्द्रः सन्प्रजाः पालयति। जिघांसत्यसुररक्षांसि। एष वायुरावहप्रवहादिभेदः। किं चैष पृथिवी रयिर्देवः सर्वस्य जगतः सन्मूर्तमसदमूर्तं चामृतं च यद्देवानां स्थितिकारणं किं बहुना ॥ ५ ॥**

**भाष्यार्थ**—त्यांनीं कसें स्तवन केलें तें पुढील खंडांत सांगितलें आहे–हा प्राण अग्नि होऊन ज्वलनक्रिया करितो ( पेटतो ). त्याचप्रमाणें हा सूर्य होऊन प्रकाशतो. तसाच हा पर्जन्य होऊन वृष्टि करितो. तसाच इंद्र होऊन प्रजेचें पालन करितो; असुर व राक्षस यांस मारण्याची इच्छा करितो. हा प्राण आवह-प्रवहादि सात वायु-

गण होऊन ज्योतिश्चक्रादिकांस वाहतो. तसाच हा देव पृथ्वी होऊन सर्व जगाचा धारयिता ( धारक ) व रयि ( चंद्र ) होऊन मूर्त, अमूर्त व फार काय, पण देवांच्याहि स्थितीचें जें कारण अमृत तें बनतो आणि सर्वांस पोसतो. ५.

**श्रुतिः—अरा इव रथनाभौ प्राणे सर्वं प्रतिष्ठितम् । ऋचो यजूꣳषि सामानि यज्ञः क्षत्रं ब्रह्म च ।। ६ ।।**

**अर्थ**—रथाच्या नाभीमध्यें जसे अर त्याप्रमाणें प्राणांत सर्व प्रतिष्ठित आहे. ऋचा, यजूंषें, सामें, यज्ञ, क्षत्रजाति व ब्राह्मणजाति [ हें सर्व प्रतिष्ठित आहे. ] ६.

**भाष्यं—अरा इव रथनाभौ श्रद्धादि नामान्तं सर्वं स्थितिकाले प्राण एव प्रतिष्ठितम् । तथर्चो यजूंषि सामानीति त्रिविधा मन्त्रास्तत्साध्यश्च यज्ञः क्षत्रं च सर्वस्य पालयितृ ब्रह्म च यज्ञादिकर्मकर्तृत्वेऽधिकृतं चैवैष प्राणः सर्वम्।।६।।**

**भाष्यार्थ**—रथाच्या चक्राच्या नाभीमध्यें जसे अर त्याप्रमाणें स्थितिकालीं सहाव्या प्रश्नांत सांगितलेलें श्रद्धेपासून नामापर्यंत षोडश कलात्मक सर्व या प्राणामध्येंच प्रतिष्ठित आहे. त्याचप्रमाणें ऋक्, यजुप् व साम असे त्रिविध मंत्र, त्यांच्या योगानें साध्य होणारा यज्ञ, सर्वांचें पालन करणारें क्षत्र ( क्षत्रिय ), ज्याला यज्ञादि कर्म करण्याचा अधिकार दिला आहे तें ब्रह्म ( ब्राह्मण ) इत्यादि सर्व हा प्राणच आहे. ६.

**श्रुतिः—प्रजापतिश्चरसि गर्भे त्वमेव प्रतिजायसे । तुभ्यं प्राण प्रजास्त्विमा बलिं हरन्ति यः प्राणैः प्रतितिष्ठसि ।। ७ ।।**

**अर्थ**—हे प्राणा, प्रजापति तूंच आहेस. तूंच गर्भांत संचार करितोस व मातापित्यासारखा होऊन उत्पन्न होतोस. या सर्व प्रजा तुझ्याकरितांच चक्षुरादिद्वारांनीं बलि आणितात. कारण तूं सर्व शरीरांत इंद्रियांसह राहतोस. ७.

**भाष्यं—किंच यः प्रजापतिरपि स त्वमेव गर्भे चरसि पितुर्मातुश्च प्रतिरूपः सन्प्रतिजायसे प्रजापतित्वादेव प्रागेव सिद्धं तव मातृपितृत्वम् । सर्वदेहदेह्याकृतिच्छद्मनैकः प्राणः सर्वात्माऽसीत्यर्थः । तुभ्यं त्वदर्थं या इमा मनुष्याद्याः प्रजास्तु हे प्राण चक्षुरादिद्वारैर्बलिं हरन्ति । यस्त्वं प्राणैश्चक्षुरादिभिः सह प्रतितिष्ठसि सर्वशरीरेष्वतस्तुभ्यं बलिं हरन्तीति युक्तम् । भोक्ता हि यतस्त्वं तवैवान्यत्सर्वं भोज्यम् ।। ७ ।।**

**भाष्यार्थ**—तसेंच, जो प्रजापति-विराट् तोहि तूंच. पित्याच्या गर्भामध्यें रेतोरूपानें व मातेच्या गर्भामध्यें पुत्ररूपानें तूंच चालतोस ( संचार करतोस ) आणि मागून त्यांच्या सारख्याच आकाराचा होऊन उत्पन्न होतोस. तूं प्रजापति असल्यामुळें तुझें मातृत्व-पितृत्व पूर्वींच सिद्ध आहे. ( यास्तव येथें प्राणाचें नुस्तें पुत्ररूपत्वच सांगितलें

आहे-)=सर्व देह व देहि (देहवान्) यांच्या आकृतीच्या मिषानें तूं एक प्राणच सर्वात्मा आहेस, असा याचा इत्यर्थ आहे. हे प्राणा, या सर्व मनुष्यादि प्रजा चक्षुरादि करणांच्या (ज्ञान-कर्मसाधनांच्या) द्वारांनीं तुजकरितां बलिहरण करितात. (बलि, भोग्य आणितात.)=जो तूं चक्षुरादि इतर (अमुख्य) प्राणांसह सर्व शरीरांत राहतोस त्या तुजकरितां बलिहरण करितात, हें म्हणणें युक्तच आहे. कारण ज्याअर्थी तूं भोक्ता आहेस त्याअर्थी हें दुसरें सर्व भोज्य तुझेंच आहे. ७.

**श्रुतिः—देवानामसि वह्नितमः पितॄणां प्रथमा स्वधा। ऋषीणां चरितं सत्यमथर्वाङ्गिरसामसि ॥ ८ ॥**

**अर्थ**—देवांतील तूं हवींचा उत्तम पोंचविणारा आहेस. पितरांची पहिली स्वधा आहेस. अथर्वांगिरस ऋषींचें म्ह० चक्षुरादि प्राणांचें तूं सत्य चरित आहेस. ८.

**भाष्यं—किं च देवानामिन्द्रादीनामसि भवसि त्वं वह्नितमो हविषां प्रापयितृतमः। पितॄणां नान्दीमुखे श्राद्धे या पितृभ्यो दीयते स्वधाऽन्नं सा देवप्रधानमपेक्ष्य प्रथमा भवति। तस्या अपि पितृभ्यः प्रापयिता त्वमेवेत्यर्थः। किं चर्षीणां चक्षुरादीनां प्राणानामङ्गिरसामङ्गिरसभूतानामथर्वणां तेषामेव 'प्राणो वाऽथर्वा' इति श्रुतेः चरितं चेष्टितं सत्यमवितथं देहधारणाद्युपकारलक्षणं त्वमेवासि ॥ ८ ॥**

**भाष्यार्थ**—शिवाय तूं इंद्रादि देवांतील वह्नितम (हविष्यें पोंचविणारा मुख्य आहेस. येथें वह्र् म्हणजे नेणें, पोंचविणें या धातूपासून झालेला हा वह्नि—शब्द आहे.) तूं पितरांची पहिली स्वधा आहेस. [स्वधा म्हणजे पितरांस उद्देशून दिलेलें अन्न.] =यज्ञादि दैव कर्मांमध्यें नान्दीश्राद्ध अवश्य करावें लागतें. त्या पितरांच्या नान्दीमुख श्राद्धांत पितरांस जें अन्न दिलें जातें तें देवप्रधान कर्माच्या अपेक्षेनें प्रथमा स्वधा होतें. त्या प्रथम स्वधेला पितरांपर्यंत नेऊन पोंचविणाराहि तूंच (प्राण) आहेस, असा याचा इत्यर्थ होय. त्याचप्रमाणें ऋषींचें म्हणजे चक्षुःप्रभृति प्राणांचें—त्याच अंगिरसभूत अथर्वांचें, कारण 'प्राणो वाऽथर्वा' अशी श्रुति आहे; देहधारणादि उपकाररूप सत्य चेष्टित तूंच आहेस. (ऋष् हा धातु गति या अर्थी आहे व सर्व गत्यर्थधातु ज्ञानार्थ असतात. यास्तव ऋषिशब्दावरून ज्ञानजनक चक्षुरादि इंद्रियें घेतलीं आहेत. प्राणांच्या अभावीं अंगें शुष्क होत असतात. म्हणून त्यांना अंगिरसत्व आहे म्हणजे अंगांतील रस असें म्हटलें आहे. 'प्राणो वा अथर्वा' असें म्हणून स्वतः श्रुतीनेंच मुख्य प्राणाला—नाकांतून उच्छ्वासरूपानें बाहेर पडणाऱ्या वायूला—अथर्व म्हटलें आहे. चक्षुरादिकहि त्याचे अंश असल्यामुळें अथर्व होत.) ८.

**श्रुतिः—इन्द्रस्त्वं प्राण तेजसा रुद्रोऽसि परिरक्षिता । त्वमन्तरिक्षे चरसि सूर्यस्त्वं ज्योतिषां पतिः ॥ ९ ॥**

**अर्थ**—हे प्राणा, तूं इन्द्र आहेस; आपल्या संहारक तेजानें रुद्र आहेस. [ सौम्य रूपानें ] जगाचें सर्वतः रक्षण करणारा आहेस. तूं अंतरिक्षांत संचार करितोस. तूं ज्योतींचा पति सूर्य आहेस ९.

**भाष्यं—इन्द्रः परमेश्वरस्त्वं हे प्राण तेजसा वीर्येण रुद्रोऽसि संहरञ्जगत् । स्थितौ च परि समन्ताद्रक्षिता पालयिता परिरक्षिता त्वमेव जगतः सौम्येन रूपेण । त्वमन्तरिक्षेऽजस्रं चरसि उदयास्तमयाभ्यां सूर्यस्त्वमेव च सर्वेषां ज्योतिषां पतिः ॥ ९ ॥**

**भाष्यार्थ**—हे प्राणा, तूं ' इन्द्र '-परमेश्वर आहेस. आपल्या वीर्यानें जगाचा संहार करणारा रुद्रहि तूंच आहेस. त्याचप्रमाणें स्थितिसमयीं सौम्य विष्णुरूपानें जगाचें सर्व बाजूंनीं परिरक्षण-पालन करणाराहि तूंच. तूं अंतरिक्षांत उदय व अस्त यांच्या योगानें सतत गमन करितोस. तूंच सर्व ज्योतींचा पति सूर्य आहेस ९.

**श्रुतिः—यदा त्वमभिवर्षस्यथेमाः प्राणते प्रजाः । आनन्दरूपास्तिष्ठन्ति कामायान्नं भविष्यतीति ॥ १० ॥**

**अर्थ**—तूं जेव्हां पर्जन्य होऊन वर्षाव करितोस तेव्हां या प्रजा प्राणचेष्टा करितात आणि आम्हांला आतां यथेच्छ अन्न होईल, असें म्हणून आनन्दरूप राहतात. १०.

**भाष्यं—यदा पर्जन्यो भूत्वाऽभिवर्षसि त्वमथ तदाऽन्नं प्राप्येमाः प्रजाः प्राणते प्राणचेष्टां कुर्वन्तीत्यर्थः । अथवा प्राण ते तवेमाः प्रजाः स्वात्मभूतास्त्वदन्न-संवर्धितास्त्वदभिवर्षणदर्शनमात्रेण चाऽऽनन्दरूपाः सुखं प्राप्ता इव सत्यस्तिष्ठन्ति । कामायेच्छातोऽन्नं भविष्यतीत्येवमभिप्रायः ॥ १० ॥**

**भाष्यार्थ**—तूं जेव्हां पर्जन्य होऊन, सर्वतः वर्षाव करितोस तेव्हां अन्नास प्राप्त होऊन ही सर्व प्रजा ' प्राणते '-प्राणन करिते; प्राणचेष्टा करिते, असा याचा भावार्थ. अथवा ' हे प्राण, ते '-हे प्राणा, तुझ्या या सर्व स्वात्मभूत प्रजा तुझ्या अन्नानें वाढलेल्या आहेत व त्या तुझें हें जलाभिवर्षण नुस्तें पाहूनच्च आनंदरूप सुखास प्राप्त झाल्यासारख्याच होऊन राहत आहेत. सुखरूप होऊन राहण्यांत त्यांचा अभिप्राय ' आतां आमच्या इच्छेप्रमाणें अन्न होईल ' हा आहे. ( या जलवर्षणामुळें आम्हांला यथेच्छ अन्न मिळेल, ही आशाच त्यांच्या आनंदाचें कारण आहे. ) १०.

**श्रुतिः—व्रात्यस्त्वं प्राणैकऋषिरत्ता विश्वस्य सत्पतिः वयमाद्यस्य दातारः पिता त्वं मातरिश्व नः ॥ ११ ॥**

**अर्थ**--हे प्राणा, तूं व्रात्य-संस्कारहीन आहेस. एक-ऋषि नांवाचा अग्नि, अत्ता विश्वाचा सत्पति आहेस. आम्ही तुझ्या भक्षणीय हवीचे दाते आहों. हे वायो, तूं आमचा पिता आहेस. ११.

**भाष्यं--किं च प्रथमजत्वादन्यस्य संस्कर्तुरभावादसंस्कृतो व्रात्यस्त्वं स्वभावत एव शुद्ध इत्याभिप्रायः। हे प्राणैकऋषिस्त्वमाथर्वणानां प्रसिद्ध एकर्षिनामाग्निः सन्नत्ता सर्वहविषाम्। त्वमेव विश्वस्य सर्वस्य सतो विद्यमानस्य पतिः सत्पतिः। साधुर्वा पतिः सत्पतिः। वयं पुनराद्यस्य तवादनीयस्य हविषो दातारः। त्वं पिता मातरिश्व हे मातरिश्वन्नोऽस्माकम्। अथ वा मातरिश्वनो वायोस्त्वम्। अतश्च सर्वस्यैव जगतः पितृत्वं सिद्धम्॥ ११॥**

**भाष्यार्थ**-शिवाय हे प्राणा, तूं सर्वांच्या अगोदर उत्पन्न झालेला आहेस. त्यामुळें तुझा संस्कार करील असा दुसरा कोणी नसल्याकारणानें तूं असंस्कृत, व्रात्य (संस्कारहीन) आहेस. तूं स्वभावतःच शुद्ध आहेस, असा याचा अर्थ. हे प्राणा, तूं अथर्वणांचा प्रसिद्ध एक-ऋषिनामक अग्नि असून सर्व हवींचा अत्ता आहेस. तूंच ' सत्पतिः०' -या सर्व विद्यमान विश्वांचा पति किंवा 'सत्पति'-या सर्वांचा साधु-उत्तम पति आहेस. आम्ही तर तुझ्या ' आद्य '-भक्ष्य हवीचे दाते आहों. हे मातरिश्वन्-आकाशांत गमन करणाऱ्या वायो-तूं आमचा पिता आहेस. अथवा तूं ' मातरिश्वनः पिता ' -म्हणजे वायूचा पिता आहेस. आणि यावरून तुझें सर्व जगाचें पितृत्व सिद्ध झालें. ११.

**श्रुतिः--या ते तनूर्वाचि प्रतिष्ठिता या श्रोत्रे या च चक्षुषि। या च मनसि संतता शिवां तां कुरु मोत्क्रमीः॥ १२॥**

**अर्थ**--जी तुझी तनु वाणीमध्यें प्रतिष्ठित आहे, जी श्रोत्रांत व जी चक्षूमध्यें आहे, जी मनामध्यें संतत-व्याप्त आहे तिला शांत कर. स्वतःच्या उत्क्रमणानें तिचा नाश करूं नको. १२.

**भाष्यं—किं बहुना या ते त्वदीया तनूर्वाचि प्रतिष्ठिता वक्तृत्वेन वदनचेष्टां कुर्वती। या श्रोत्रे या च चक्षुषि या च मनसि संकल्पादिव्यापारेण संतता समनुगता तनूस्तां शिवां शान्तां कुरु मोत्क्रमीरुत्क्रमणेनाशिवां मा कार्षीरित्यर्थः॥१२॥**

**भाष्यार्थ**—फार काय पण ' या ते तनूः०'-तुझी जी तनु ' वाचि प्रतिष्ठिता० ' -वाणीमध्यें वक्तृत्वरूपानें भाषणरूप चेष्टा करीत स्थित आहे, तशीच जी श्रोत्रामध्यें, चक्षूमध्यें व मनामध्यें संकल्पादिव्यापारानें, सतत व्यापून राहणारी तनु आहे तिला शिव -शांत कर. ' मोत्क्रमीः०'-उत्क्रमणानें तिला अशिव-अमंगल, अशान्त करूं नको. असा याचा इत्यर्थ. १२.

**श्रुतिः--प्राणस्येदं वशे सर्वं त्रिदिवे यत्प्रतिष्ठितं । मातेव पुत्रान्रक्षस्व श्रीश्च प्रज्ञां च विधेहि न इति ॥ १३ ॥**

**इत्यथर्ववेदीयप्रश्नोपनिषदि द्वितीयः प्रश्नः ॥ २ ॥**

**अर्थ**--या त्रैलोक्यांत जें प्रतिष्ठित आहे तें सर्व प्राणाच्या अधीन आहे. माता जशी पुत्राचें रक्षण करिते त्याप्रमाणें तूं आमचें रक्षण कर; आणि आम्हांला श्री व प्रज्ञा-बुद्धि दे. १३.

**भाष्यं--किं बहुना अस्मिल्लोँके प्राणस्यैव वशे सर्वमिदं यत्किंचिदुपभोगजातं त्रिदिवे तृतीयस्यां दिवि च यत्प्रतिष्ठितं देवाद्युपभोगलक्षणं तस्यापि प्राण एवेशिता रक्षिता । अतो मातेव पुत्रानस्मान्रक्षस्व पालयस्व । त्वन्निमित्ता हि ब्राह्म्यः क्षात्रियाश्च श्रियस्तास्त्वं श्रीश्च श्रियश्च प्रज्ञां च त्वत्स्थितिनिमित्तां विधेहि नो विधत्स्वेत्यर्थः । इत्येवं सर्वात्मतया वागादिभिः प्राणैः स्तुत्या गमितमहिमा प्राणः प्रजापतिरत्तेत्यवधृतम् ॥ १३ ॥**

**इति श्रीमत्परमहंसपरिव्राजकाचार्यश्रीमद्गोविन्दभगवत्पूज्यपादशिष्य-श्रीमच्छंकरभगवतः कृतौ प्रश्नोपनिषद्भाष्ये द्वितीयः प्रश्नः ॥ २ ॥**

**भाष्यार्थ**--किंबहुना 'प्राणस्येदं वशे सर्वं०'-या लोकीं जेवढें म्हणून उपभोगजात आहे, तें सर्व प्राणाच्याच वश आहे. स्वर्गसंज्ञक तिसऱ्या द्युलोकांत देवादिकांच्या उपभोगरूप जें कांहीं आहे त्याचाहि रक्षक प्राणच आहे. यास्तव माता जशी पुत्राचें तसें तूं आमचें पालन कर. तुझ्या निमित्तानेंच ब्राह्मणांच्या व क्षत्रियांच्या श्री-विभूती विद्यमान असतात. त्या श्री व-'त्वत्स्थितिनिमित्तां'-तुझ्या स्थितीमुळें स्थित होणारी प्रज्ञा तूं कर, आम्हांस दे, असा भावार्थ. अशा रीतीनें वागादि प्राणांनीं स्तुतीच्या योगानें ज्याचा महिमा सर्वात्मतेनें सर्वांस ज्ञात केला आहे असा प्राण प्रजापति, अत्ता आहे, हें निश्चित झालें. १३.

इति प्रश्नोपनिषद्भाष्यार्थांचा दुसरा प्रश्न समाप्त.

---

## अथ तृतीयः प्रश्नः

**श्रुतिः—अथ हैनं कौसल्यश्चाऽऽश्वलायनः पप्रच्छ । भगवन्कुत एष प्राणो जायते कथमायात्यस्मिञ्शरीर आत्मानं वा प्रविभज्य कथं प्रातिष्ठते केनोत्क्रमते कथं बाह्यमभिधत्ते कथमध्यात्ममिति ॥ १ ॥**

**अर्थ**--नंतर पिप्पलाद आचार्याला कौसल्य आश्वलायन विचारता झाला-भगवन्, हा प्राण कोणापासून उत्पन्न होतो ? या शरीरांत कसा येतो ? आपला विभाग करून

शरीरांत कसा राहतो ? कोणत्या विशेष वृत्तीनें शरीरांतून निघून जातो ? आणि बाह्य —अधिभूत व अधिदैव आणि अध्यात्म यांना कसें धारण करितो ? १.

**भाष्यं--अथ हैनं कौसल्यश्चाऽऽश्वलायनः पप्रच्छ । प्राणो ह्येवं प्राणैर्निर्धारिततत्त्वैरुपलब्धमहिमाऽपि संहतत्वात्स्यादस्य कार्यत्वमतः पृच्छामि । भगवन्कुतः कस्मात्कारणादेष यथावधृतः प्राणो जायते । जातश्च कथं केन वृत्तिविशेषेणाऽऽयात्यस्मिञ्शरीरे । किंनिमित्तकमस्य शरीरग्रहणमित्यर्थः । प्रविष्टश्च शरीर आत्मानं वा प्रविभज्य प्रविभागं कृत्वा कथं केन प्रकारेण प्रातिष्ठते प्रतितिष्ठति । केन वा वृत्तिविशेषेणास्माच्छरीरादुत्क्रमत उत्क्रामति । कथं बाह्यमधिभूतमधिदैवतं चाभिधत्ते धारयति कथमध्यात्ममिति ॥ १ ॥**

**भाष्यार्थ**--(वरील प्रश्नांत प्राणाचें प्रजापतित्व, अत्तृत्व, इत्यादि गुणजात निश्चित केलें. आतां त्याच्या उत्पत्त्यादिकांचा निश्चय करून त्याच्या उपासनेचें विधान करण्यास्तव हा तिसरा प्रश्न आरंभितात–)=' अथ०'–पिप्पलाद आचार्यांनीं विदर्भीच्या प्रश्नाचें उत्तर दिल्यानंतर ' हैनं कौसल्यः० '–आश्वलायन कौसल्य ( म्हणजे चवथा मुनि ) त्यांस विचारूं लागला. ' भगवन्० '–भगवन्, वर वर्णन केल्याप्रमाणें ज्यांनीं प्राणाच्या तत्त्वाचा निश्चय केला आहे अशा वागादि-प्राणांनीं त्याचा महिमा जरी जाणला तरी तो संहत ( इतरांशीं संघात पावलेला, मिळालेला, अनेकात्मक, सावयव ) असल्यामुळें त्याला कार्यत्वहि असेल; म्हणून मी विचारतों, कीं 'कुतः एषः०' –कोणत्या कारणापासून हा पूर्वोक्त प्राण उत्पन्न होतो ? आणि उत्पन्न झालेला हा 'कथमायाति० '–कोणत्या विशेष वृत्तीनें ( व्यापारानें ) या शरीरांत येतो ? ह्याचें शरीरग्रहण किंनिमित्त आहे, त्याच्या शरीरधारणाचें निमित्त काय ? असा इत्यर्थ. 'आत्मानं वा० '–त्याचप्रमाणें शरीरांत प्रविष्ट झालेला हा आपल्याला विभक्त करून कोणत्या प्रकारानें प्रतिष्ठित होतो ? 'केनोत्क्रमते'–कोणत्या विशेष वृत्तीनें तो या शरीरांतून उत्क्रमण करितो ? ( उत्क्रमण म्हणजे सोडून जाणें )=' कथं बाह्यं० '–बाह्य–म्हणजे अधिभूत व अधिदैव यांचें तो कसें धारण करितो? आणि अध्यात्माचें कसें धारण करितो. १.

**श्रुतिः--तस्मै स होवाचातिप्रश्नान्पृच्छसि ब्रह्मिष्ठोऽसीति तस्मात्तेऽहं ब्रवीमि ॥ २ ॥**

**अर्थ**--त्याला तो म्हणाला–" तूं अतिप्रश्न–कठिण प्रश्न–पलीकडचे प्रश्न विचारतोस. तूं ब्रह्मिष्ठ आहेस. यास्तव मी तुला सांगतों."२.

**भाष्यं--एवं पृष्टस्तस्मै स होवाचाऽऽचार्यः । प्राण एव तावद्दुर्विज्ञेयत्वाद्विषमप्रश्नार्हस्तस्यापि जन्मादि त्वं पृच्छस्यतोऽतिप्रश्नान्पृच्छसि । ब्रह्मिष्ठोऽसीत्यतिशयेन त्वं ब्रह्मविदतस्तुष्टोऽहं तस्मात्ते तुभ्यं ब्रवीमि यत्पृष्टं शृणु ॥ २ ॥**

**भाष्यार्थ**—शिष्यानें असा प्रश्न केला असतां आचार्य त्यास म्हणतो–प्राणच अगोदर दुर्ज्ञेय असल्यामुळें त्याविषयीं प्रश्न करणें फार कठिण आहे. पण तूं तर त्याचेंहि जन्मादि विचारीत आहेस. तस्मात् तूं दुसऱ्या सर्वांच्या प्रश्नांचें अतिक्रमण करून सूक्ष्मविषयक प्रश्न विचारीत आहेस. तूं ब्रह्मिष्ठ आहेस. अपर ब्रह्माच्या अपेक्षेनें अतिशयित ( मुख्य, वरिष्ठ ) असलेल्या ब्रह्माला तूं जाणतोस. ( प्रोत्साहन देण्याकरितां ही स्तुति आहे. )=यास्तव तुझा प्रश्न ऐकून मी संतुष्ट झालों आहें. म्हणून मी तुझ्या प्रश्नाचें उत्तर सांगतों, तें ऐक. २.

**श्रुतिः—आत्मन एष प्राणो जायते । यथैषा पुरुषे छायैतस्मिन्नेतदाततं मनोकृतेनाऽऽयात्यस्मिञ्शरीरे ॥ ३ ॥**

**अर्थ**—आत्म्यापासून हा प्राण उत्पन्न होतो. ज्याप्रमाणें ही पुरुषामुळें छाया त्याप्रमाणें या सत्य पुरुषामध्यें हें प्राणतत्त्व समर्पिलेलें आहे. तो प्राण मनःसंकल्पादिजन्य कर्मामुळें या शरीरांत येतो. ३.

**भाष्यं—आत्मनः परस्मात्पुरुषादक्षरात्सत्यादेष उक्तः प्राणो जायते । कथमित्यत्र दृष्टान्तः । यथा लोक एषा पुरुषे शिरःपाण्यादिलक्षणे निमित्ते छाया नैमित्तिकी जायते तद्वदेतस्मिन्ब्रह्मण्येतत्प्राणाख्यं छायास्थानीयमनृतरूपं तत्त्वं सत्ये पुरुष आततं समर्पितमित्येतत् । छायेव देहे । मनोकृतेन मनःसंकल्पेच्छादिनिष्पन्नकर्मनिमित्तेनेत्येतत् । वक्ष्यति हि पुण्येन पुण्यमित्यादि । तदेव सक्तः सह कर्मणेति च श्रुत्यन्तरात् । आयात्यागच्छत्यस्मिञ्शरीरे ॥ ३ ॥**

**भाष्यार्थ**—‘ आत्मनः ’–आत्म्यापासून, पर पुरुषापासून, अक्षरापासून, सत्यापासून ‘ एष प्राणो जायते ’–हा पूर्वोक्त प्राण उत्पन्न होतो. ( मुंडकांतील ‘दिव्यो ह्यमूर्तः पुरुषः, अक्षरात्परतः परः । ’ व ‘ एतस्माज्जायते प्राणो मनः सर्वेन्द्रियाणि च । ’ या दोन मंत्रांशीं या ब्राह्मणाचा संबंध आहे, हें दाखविण्याकरितां भाष्यकारांनीं पर, पुरुष, अक्षर इत्यादि तेथील शब्दांचाच भाष्यांत उपयोग केला आहे. )=तो कसा उत्पन्न होतो, याविषयीं दृष्टान्त–‘ यथैषा पुरुषे छाया ’–ज्याप्रमाणें लोकांत मस्तक-हात-पाय इत्यादिरूप पुरुष, हें निमित्त असलें कीं त्याची ही सर्वलोकप्रसिद्ध नैमित्तिक प्रतिबिंबादिरूप छाया उत्पन्न होते त्याप्रमाणें या प्रकृत–जनक आत्म्याच्या–ब्रह्माच्या –ठिकाणीं, सत्य पुरुषामध्यें हें प्राणसंज्ञक छायास्थानीय अनृतरूप असत्य, मिथ्या तत्त्व समर्पण केलेलें आहे, असा भावार्थ. देहांत जशी छाया तसें ब्रह्मामध्यें प्राणतत्त्व. ( आतां प्राण या शरीरांत कसा येतो, तें सांगतात–)=‘ मनोकृतेन ’–तो प्राण मनाच्या संकल्प, इच्छा इत्यादिकांमुळें झालेल्या कर्माच्या निमित्तानें या शरीरांत येतो,

कर्मामुळें त्याला शरीर धारण करावें लागतें, असा भावार्थ. 'पुण्येन पुण्यं०'–असें पुढें मूळ श्रुतींतच म्हटलें जातील. 'तदेव सक्तः सह कर्मणा' अशी दुसरी श्रुति आहे. (तिचा अर्थ असा–या कर्मठाचें मन ज्या फलांत आसक्त झालेलें असतें त्याच्याकडे तो त्या कर्मासह जातो. या श्रुतींत शरीरग्रहण कर्मसाध्य आहे, असें सांगितलें आहे.) =' आयात्यस्मिञ्शरीरे '–( प्राण मनःसंकल्पामुळें झालेल्या कर्मांच्या योगानें–)=या शरीरांत येतो. ३.

**श्रुतिः––यथा सम्राडेवाधिकृतान्विनियुङ्क्ते । एतान्ग्रामानेतान्ग्रामानधितिष्ठस्वेत्येवमेवैष प्राण इतरान्प्राणान्पृथक्पृथगेव संनिधत्ते ॥ ४ ॥**

**अर्थ**––ज्याप्रमाणें सम्राड् राजाच आपल्या अधिकाऱ्यास " तूं या गांवावर, तूं या गांवावर अधिकारी हो;" असें सांगून त्यांना नेमतो, त्याप्रमाणें हा प्राण इतर प्राणांस पृथक् पृथक्‌च नेमतो. ४.

**भाष्यं––यथा येन प्रकारेण लोके राजा सम्राडेव ग्रामादिष्वधिकृतान्विनियुङ्क्ते । कथम् । एतान्ग्रामानेतान्ग्रामानधितिष्ठस्वेति । एवमेव यथा दृष्टान्तः । एष मुख्यः प्राण इतरान्प्राणांश्चक्षुरादीनात्मभेदांश्च पृथक्पृथगेव यथास्थानं संनिधत्ते विनियुङ्क्ते ॥ ४ ॥**

**भाष्यार्थ**–– ('तो आपला विभाग करून यामध्यें कसा राहतो ?' या प्रश्नाचें उत्तर–)= 'यथा सम्राडेव'–लोकांमध्यें जसा एखादा राजा सम्राड्‌च अधिकाऱ्यांस नेमतो, तें कसें ? 'तूं या गांवांत रहा' तूं या गावांत रहा' असें आज्ञावचन बोलून ग्रामादिकांमध्यें अधिकाऱ्यांस नियुक्त करितो त्याप्रमाणेंच–या वरील दृष्टान्तानुसार हा मुख्य प्राण इतर अमुख्य प्राणांस –चक्षुरादि आपल्या भेदांस, पृथक् पृथक्‌च ज्यांच्या त्यांच्या उचित स्थानीं नियुक्त करितो.

**श्रुतिः––पायूपस्थेऽपानं चक्षुःश्रोत्रे मुखनासिकाभ्यां प्राणः स्वयं प्रातिष्ठते मध्ये तु समानः । एष ह्येतद्धुतमन्नं समं नयति तस्मादेताः सप्तार्चिषो भवन्ति ॥ ५ ॥**

**अर्थ**––पायु व उपस्थ यांत अपानास नेमितो. मुख व नासिका यांतून बाहेर निघणारा प्राण स्वतः चक्षु व श्रोत्र यांत प्रतिष्ठित होतो व मध्यें समान राहतो. हाच हें जठराग्नींत टाकलेलें अन्न शरीरांत समप्रमाणानें नेतो. त्याच्यापासून दर्शन, श्रवण इत्यादि या सात ज्वाला होतात. ५.

**भाष्यं––तत्र विभागः–पायूपस्थे पायुश्चोपस्थश्च पायूपस्थं तस्मिन् । अपानमात्मभेदं मूत्रपुरीषाद्यपनयनं कुर्वंस्तिष्ठति संनिधत्ते । तथा चक्षुःश्रोत्रे चक्षुश्च श्रोत्रं च चक्षुःश्रोत्रं तस्मिंश्चक्षुःश्रोत्रे । मुखनासिकाभ्यां च मुखं च नासिका च**

**ताभ्यां मुखनासिकाभ्यां च निर्गच्छन्प्राणः स्वयं सम्राट्स्थानीयः प्रातिष्ठते प्रतितिष्ठति । मध्ये तु प्राणापानयोः स्थानयोर्नाभ्याम् । समानोऽशितं पीतं च समं नयतीति समानः । एष हि यस्माद्यदेतद्धुतं भुक्तं पीतं चाऽऽत्माग्नौ प्रक्षिप्तमन्नं समं नयति तस्मादशितपीतेन्धनादग्नेरौदर्याद्धृदयदेशं प्राप्तादेताः सप्तसंख्याका अर्चिषो दीप्तयो निर्गच्छन्त्यो भवन्ति शीर्षण्यः । प्राणद्वारा दर्शनश्रवणादिलक्षणरूपादिविषयप्रकाशा इत्यभिप्रायः ॥ ५ ॥**

**भाष्यार्थ**--आतां त्यानें त्याचा विभाग कसा केला तें सांगतात--'पायूपस्थेऽपानं०' --पायु ( गुदेन्द्रिय ) व उपस्थ ( जननेन्द्रिय ) यांमध्यें अपान नांवाच्या आपल्या भेदाला स्थापून मूत्र, पुरीप (विष्ठा) इत्यादिकांना बाहेर घालविणें, या कामांत त्याचा विनियोग करितो. त्याचप्रमाणें 'चक्षुःश्रोत्रे०'--मुख व नासिका यांच्या द्वारा बाहेर पडणारा व स्वतः सम्राटासारखा असलेला प्राण चक्षु व श्रोत्र यांत प्रतिष्ठित होतो. 'मध्ये तु समानः '--प्राण व अपान या दोहोंच्या स्थानांमध्यें नाभींत समानाला तो नियुक्त करितो. खाल्लेल्या व प्यालेल्या पदार्थांना जो ( शरीरभर ) सम पोंचवितो तो समान होय. कारण हा समानच आत्माग्नींत ( जठराग्नींत ) हवन केलेलें--खाल्लेलें व प्यालेलें अन्न शरीरभर एकसारखें पोंचवितो. नंतर तें खाल्लेलें व प्यालेलें अन्न हेंच ज्याचें इंधन आहे अशा हृदयप्रदेशीं प्राप्त झालेल्या त्या जठराग्नीपासून या मस्तकसंबंधी गोलकांत राहणाऱ्या सात ज्वाला-- दीप्ती निघतात. प्राणाच्या द्वारा रूप-रसादि विषयांचें दर्शन, श्रवण इत्यादि प्रकाश याच त्या सात दीप्ती होत. ( दोन दर्शन, दोन श्रवण, दोन घ्राण व मुखस्थ रसना, अशा त्या सात ज्वाला होत. जठराग्नीच्या योगानें परिपक्व झालेल्या अन्नरसाच्या बलानें दर्शनादिकांची प्रवृत्ति होत असल्यामुळें त्यांना जठराग्नीच्या ज्वाला म्हटलें आहे. ) ५.

**श्रुतिः--हृदि ह्येष आत्मा । अत्रैतदेकशतं नाडीनां तासां शतं शतमेकैकस्यां द्वासप्ततिर्द्वासप्ततिः प्रतिशाखानाडीसहस्राणि भवन्त्यासु व्यानश्चरति ॥ ६ ॥**

**अर्थ**--हा आत्मा हृदयांत आहे. या हृदयांत एकशें एक नाड्या आहेत. त्यांना प्रत्येकीं एकशें एक शाखा आहेत. त्यांतील प्रत्येक शाखेच्या बहात्तर सहस्र प्रतिशाखारूप नाड्या आहेत. त्यांतून व्यान संचार करितो. ६.

**भाष्यं--हृदि ह्येष पुण्डरीकाकारमांसपिण्डपरिच्छिन्ने हृदयाकाश एष आत्माऽऽत्मना संयुक्तो लिङ्गात्मा । अत्रास्मिन्हृदय एतदेकशतमेकोत्तरशतं संख्यया प्रधाननाडीनां भवतीति । तासां शतं शतमेकैकस्याः प्रधाननाड्या भेदाः । पुनरपि द्वासप्ततिर्द्वासप्ततिर्द्वे द्वे सहस्रे अधिके सप्ततिश्च सहस्राणि । सहस्राणां**

द्वासप्ततिः प्रतिशाखानाडीसहस्राणि प्रतिप्रतिनाडीशतं संख्यया प्रधाननाडीनां सहस्राणि भवन्ति। आसु नाडीषु व्यानो वायुश्चरति। व्यानो व्यापनात्। आदित्यादिव रश्मयो हृदयात्सर्वतोगामिनीभिर्नाडीभिः सर्वदेहं संव्याप्य व्यानो वर्तते। संधिस्कन्धमर्मदेशेषु विशेषेण प्राणापानवृत्त्योश्च मध्य उद्भूतवृत्तिर्वीर्यवत्कर्मकर्ता भवति ॥ ६ ॥

**भाष्यार्थ**—'हृदि'—शुभ्रकमलाकार मांसाच्या पिंडानें (गोळ्यानें) परिच्छिन्न झालेल्या हृदयाकाशांत 'एष आत्मा'—हा आत्मा, आत्म्यानें संयुक्त झालेला लिंगात्मा (कारण हृदय हें लिंगात्म्याचें स्थान आहे) राहतो 'अत्रैतदेकशतं०'--या हृदयामध्यें सख्येनें एकशें एक प्रधान (मुख्य) नाड्या आहेत. त्यांतील एकेका प्रधान नाडीचे शंभर शंभर भेद आहेत. पुनरपि प्रत्येक प्रधान नाडीच्या या शंभर प्रतिनाड्यांचे प्रत्येकीं बाहात्तर सहस्र भेद आहेत. (म्हणजे सर्व मिळून बाहात्तर कोटी, बाहात्तर लक्ष, दहा सहस्र, दोनशें एक इतक्या नाड्या शरीरांत आहेत. )=या नाड्यांमध्यें व्यान संचार करितो. व्यापिल्यामुळें व्यान (हें त्याचें नांव रूढ झालें आहे.) सूर्यापासून जसे किरण त्याप्रमाणें हृदयापासून सर्वतः पसरणाऱ्या नाड्यांच्या योगानें व्यान सर्व देहास व्यापून राहतो. सांधे, खांदे व मर्मप्रदेश यांमध्यें आणि विशेषतः प्राण व अपान यांच्या दोन वृत्तींमध्यें (म्हणजे प्राण व अपान यांच्या वृत्तींचा जेव्हां अभाव असतो तेव्हां–)=व्यानाची वृत्ति उद्भवते व तो वीर्यवत् (शक्तीचें) कर्म करणारा होतो. (प्राण व अपान यांचा जो संधि तोच व्यान. बलवान् पुरुषांकडून धनुष्यावर गुण चढविणें, इत्यादि जेवढीं म्हणून वीर्यसाध्य कर्में होतात तीं सर्व प्राण व अपान यांच्या गतीचा विच्छेद करूनच ते करितात, अशा अर्थाची दुसरी श्रुतिहि आहे.) ६.

**श्रुतिः—अथैकयोर्ध्व उदानः पुण्येन पुण्यं लोकं नयति पापेन पापमुभाभ्यामेव मनुष्यलोकम् ॥ ७ ॥**

**अर्थ**—पण त्यांतील एका नाडीनें ऊर्ध्व (होऊन नखशिखान्त शरीरांत संचार करणारा–)=उदान पुण्यानें पुण्य-लोकास नेतो, पापानें पाप लोकास नेतो व पुण्य व पाप यांच्यायोगानें मनुष्य-लोकास नेतो. ७

**भाष्यं—अथ या तु तत्रैकशतानां नाडीनां मध्य ऊर्ध्वगा सुषुम्नाख्या नाडी तयैकयोर्ध्वः सन्नुदानो वायुरापादतलमस्तकवृत्तिः संचरन्पुण्येन कर्मणा शास्त्रविहितेन पुण्यं लोकं देवादिस्थानलक्षणं नयति प्रापयति पापेन तद्विपरीतेन पापं नरकं तिर्यग्योन्यादिलक्षणम्। उभाभ्यां समप्रधानाभ्यां पुण्यपापाभ्यामेव मनुष्यलोकं नयतीत्यनुवर्तते ॥ ७ ॥**

**भाष्यार्थ**—( आतां उदान वायूचें स्थान सांगून ' प्राण कोणत्या मार्गानें उत्क्रमण करितो ? ' या प्रश्नाचें उत्तर देतात-)=आतां त्या हृदयस्थ एकशें एक नाड्यांतील **जी एक ऊर्ध्व गमन करणारी सुषुम्नानांवाची** नाडी आहे त्या एका नाडीच्या द्वारा ऊर्ध्ववृत्ति होऊन, उदान वायु पादतलापासून मस्तकापर्यंत ज्याची वृत्ति आहे, असा होत्साता संचार करीत शास्त्रविहित पुण्य कर्मानें देवादिस्थानलक्षण पुण्य लोकास व शास्त्रनिषिद्ध पापकर्मानें पाप लोकास, तिर्यग्योनि-इत्यादि लक्षण नरकास जीवाला पोंचवितो. पण ज्यांचें प्राधान्य समान आहे अशा दोन्ही पुण्यपापांच्या योगानेंच तो जीवाला मनुष्यलोकास पोंचवितो. अर्थात् उदान जीवाला पुण्याचें आधिक्य झाल्यास देवलोकास, पापाचें आधिक्य झाल्यास नरकलोकास व पुण्य आणि पाप हीं दोन्हीं समान झाल्यास मनुष्यलोकास पोंचवितो. ७.

**श्रुतिः--आदित्यो ह वै बाह्यः प्राण उदयत्येष ह्येनं चाक्षुषं प्राणमनुगृह्णानः। पृथिव्यां या देवता सैषा पुरुषस्यापानमवष्टभ्यान्तरा यदाकाशः स समानो वायुर्व्यानः ॥ ८ ॥**

**अर्थ**—हा प्रसिद्ध आदित्यच बाह्य प्राण उदय पावतो. तो ह्या आध्यात्मिक चाक्षुष प्राणावर अनुग्रह करणारा आहे. पृथ्वीमध्यें जी ही देवता ती पुरुषाच्या अपानाचें आकर्षण करून त्यावर अनुग्रह करीत राहते. द्यावापृथिवीच्या मधील आकाशांत राहणारा जो वायु तो समान; व सामान्यतः जो बाह्य वायु तो व्यान. ८.

**भाष्यं--आदित्यो ह वै प्रसिद्धो ह्यधिदैवतं बाह्यः प्राणः स एष उदयत्युद्गच्छति । एष ह्येनमाध्यात्मिकं चक्षुषि भवं चाक्षुषं प्राणं प्रकाशेनानुगृह्णानो रूपोपलब्धौ चक्षुष आलोकं कुर्वन्नित्यर्थः । तथा पृथिव्यामभिमानिनी या देवता प्रसिद्धा सैषा पुरुषस्यापानमपानवृत्तिमवष्टभ्याऽऽकृष्य वशीकृत्याध एवापकर्षेणेनानुग्रहं कुर्वती वर्तत इत्यर्थः । अन्यथा हि शरीरं गुरुत्वात्पतेत्सावकाशे वोद्गच्छेत् । यदेतदन्तरा मध्ये द्यावापृथिव्योर्य आकाशस्तत्स्थो वायुराकाश उच्यते । मञ्चस्थवत् । स समानः समानमनुगृह्णानो वर्तत इत्यर्थः । समानस्यान्तराकाशस्थत्वसामान्यात् । सामान्येन च यो बाह्यो वायुः स व्याप्तिसामान्याद्व्यानो व्यानमनुगृह्णानो वर्तत इत्यभिप्रायः ॥ ८ ॥**

**भाष्यार्थ**--( हा बाह्य व अध्यात्म यांस कसें धारण करितो ? या प्रश्नाचें उत्तर सांगतात-)=' आदित्यो ह वै० '-हा प्रसिद्ध आदित्य-सूर्यच अधिदैवत बाह्य प्राण असून तो उदय पावतो. हा शरीरसंबंधी चक्षूंतील चाक्षुष प्राणावर आपल्या प्रकाशानें अनुग्रह करीत राहतो. रूपाच्या उपलब्धीमध्यें नेत्राला प्रकाश देत, ( रूपो-

पलब्धीचें, रूपग्रहणाचें सामर्थ्य देत ) तो राहतो, असा याचा भावार्थ. 'पृथिव्यां या॰'–त्याचप्रमाणें पृथ्वीमध्यें जी ही अग्निसंज्ञक अभिमानिनी देवता प्रसिद्ध आहे ती पुरुषाच्या अपानवृत्तीला आकर्षण करून–आपल्या वश करून–तिला खालींच आकर्षण करणें, याच्या योगानें अनुग्रह करीत राहते, असा भावार्थ. त्या अग्निदेवतात्मक पृथ्वीनें जर पुरुषाच्या अपानवृत्तीला खालींच ओढून धरिलें नसतें, तर शरीर जड –भारी–असल्यामुळें पडलें असतें किंवा अवकाशयुक्त अंतरिक्षांत गेलें असतें. द्युलोक व पृथिवी यांच्यांमध्यें जो हा आकाश आहे त्यांतील वायूलाहि 'आकाश' असें लक्षणावृत्तीनें येथें म्हटलें आहे. 'माचे–पलंग ओरडत आहेत,' या वाक्यांत 'माचे' या शब्दावरून त्या माचांवरील लोक जसे लक्षित होतात, त्याप्रमाणेंच हें समजावें. तो आकाशसंज्ञक वायु समान आहे. तो समानावर अनुग्रह करीत राहतो, असा भावार्थ. कारण अंतराकाशांत स्थित होणें, हा समानवायूचा धर्म त्याच्या ठिकाणीं आहे ( समान शरीरांतील आकाशांत असतो व बाह्य वायु द्यावापृथिवीमधील आकाशांत राहतो. त्यामुळें त्या दोहोंचें अंतराकाशस्थत्व समान आहे. )=आणि सामान्यतः जो बाह्य वायु तोच व्याप्ति या समान धर्मामुळें व्यान होतो. म्हणजे व्यानावर अनुग्रह करीत राहतो, असा याचा अभिप्राय. ( बाह्य सामान्य वायु व शरीरांतील व्यान यांमध्यें व्याप्ति–व्यापून राहणें–हा समान धर्म आहे. ) ८.

**श्रुतिः—तेजो ह वा उदानस्तस्मादुपशान्ततेजाः । पुनर्भवमिन्द्रियैर्मनसि संपद्यमानैः ॥ ९ ॥**

**अर्थ**—तेजच उदान आहे. यास्तव जेव्हां पुरुष–ज्याचें तेज शांत झालें आहे, असा होतो तेव्हां मनामध्यें प्रवेश करणाऱ्या इंद्रियांसह दुसऱ्या शरीरास प्राप्त होतो. ९.

**भाष्यं—यद्बाह्यं ह वै प्रसिद्धं सामान्यं तेजस्तच्छरीर उदान उदानं वायुमनुगृह्णाति स्वेन प्रकाशेनेत्यभिप्रायः । यस्मात्तेजःस्वभावो बाह्यतेजोनुगृहीत उत्क्रान्तिकर्ता तस्माद्यदा लौकिकः पुरुष उपशान्ततेजा भवति । उपशान्तं स्वाभाविकं तेजो यस्य सः । तदा तं क्षीणायुषं मुमूर्षुं विद्यात् । स पुनर्भवं शरीरान्तरं प्रतिपद्यते । कथम् । सहेन्द्रियैर्मनसि संपद्यमानैः प्रविशद्भिर्वागादिभिः ॥ ९ ॥**

**भाष्यार्थ**—' तेजो ह वा ' जें बाह्य सामान्य प्रसिद्ध तेज ( आदित्यसंज्ञक विशेष तेज नव्हे ) तोच उदान. आपल्या प्रकाशानें तें उदान वायूवर अनुग्रह करितें, असा अभिप्राय. अर्थात् तें तेजच या शरीरांतील उदान आहे. तो ज्याअर्थी तेजःस्वभाव, बाह्य तेजाकडून अनुग्रह केला गेलेला व उत्क्रांतिकर्ता आहे त्याअर्थी हा लौकिक पुरुष

जेव्हां उपशान्ततेज म्ह० ज्याचें स्वाभाविक तेज उपशान्त झालें आहे असा होतो तेव्हां तो क्षीणायु–मुमूर्षु–मरणोन्मुख झाला आहे, असें जाणावें. नंतर तो पुनः होणाऱ्या दुसऱ्या शरीरास प्राप्त होतो. पण अक्रिय आत्मा अन्यशरीराचें ग्रहण कसें करूं शकतो ? ( म्हणून विचाराल तर सांगतों–)=मनामध्यें प्रवेश करणाऱ्या ( लीन होणाऱ्या ) वागादि इंद्रियांसह तो दुसऱ्या शरीरांत जातो. ( मुख्य प्राण शरीरांतील प्राणापानादि वृत्तींवर अनुग्रह करितो. त्याचप्रमाणें तो तेजोरूपी होऊन बाह्य अधिदैव आदित्यादिकांस धारण करितो. त्यानें तद्रूप होऊन राहणें, हेंच धारण होय. चक्षुरादिकांच्या अनुग्रहानें चक्षुरादिग्राह्य अधिभूतांनाहि तो धारण करितो. उत्क्रमण करणारा उदान वायु बाह्य तेजाकडून अनुगृहीत होत्साताच शरीरांत राहतो. वास्तव तो जीवांच्या जीवनाचें निमित्त ( कर्म ) संपलें असतां बाह्य तेजाच्या अनुग्रहाच्या अभावीं शांततेज होतो. हातानें शरीराला स्पर्श केला असतां तें तेज उष्णत्वानें उपलब्ध होतें, हें प्रसिद्धच आहे. ) ९.

**श्रुतिः—यच्चित्तस्तेनैष प्राणमायाति प्राणस्तेजसा युक्तः । सहाऽऽत्मना यथासंकल्पितं लोकं नयति ॥ १० ॥**

**अर्थ**—तो मरणसमयीं ज्या चित्तानें युक्त होतो त्याच चित्तानें प्राणास प्राप्त होतो. प्राण तेजानें म्ह० उदानवृत्तीनें युक्त होऊन आत्म्यासह त्याला पूर्वी संकल्प केलेल्या लोकास नेतो. १०.

**भाष्यं—मरणकाले यच्चित्तो भवति तेनैव चित्तेन संकल्पेनेन्द्रियैः सह प्राणं मुख्यप्राणवृत्तिमायाति । मरणकाले क्षीणेन्द्रियवृत्तिः सन्मुख्यया प्राणवृत्त्यैवावतिष्ठत इत्यर्थः । तदाऽभिवदन्ति ज्ञातय उच्छ्वसिति जीवतीति । स च प्राणस्तेजसोदानवृत्त्या युक्तः सन्सहाऽऽत्मना स्वामिना भोक्त्रा स एवमुदानवृत्त्यैव युक्तः प्राणस्तं भोक्तारं पुण्यपापकर्मवशाद्यथासंकल्पितं यथाभिप्रेतं लोकं नयति प्रापयति ॥ १० ॥**

**भाष्यार्थ**—( उत्क्रांतीचा क्रम दाखवून दुसऱ्या शरीराची प्राप्तिच स्पष्ट करण्याकरितां 'यच्चित्तः०' इत्यादि मंत्राचें व्याख्यान आरंभितात )=जीव मरणसमयीं 'यच्चित्त'–ज्या देवादि शरीरांत चित्त आसक्त झालें आहे असा होतो 'तेनैष आयाति'–त्याच चित्तानें, त्याच संकल्पानें इंद्रियांसह 'प्राणं'–मुख्य प्राणवृत्तीस प्राप्त होतो. प्राणी मरणसमयीं ज्याची सर्व इंद्रियवृत्ति क्षीण झाली आहे, असा होऊन मुख्य प्राणवृत्तीनेंच राहतो, असा याचा इत्यर्थ. तेव्हां त्याच्याजवळ बसलेले याच्या ज्ञातीचे लोक हा उच्छ्वास सोडीत आहे, जिवंत आहे, असें म्हणतात. पण तो प्राण

तेजानें म्हणजे उदानवृत्तीनें युक्त होऊन आत्म्यासह म्हणजे भोक्त्या स्वामीसह शरीर सोडून जातो. अशाप्रकारें उदानवृत्तीनेंच युक्त झालेला तो प्राण पूर्वोक्त भोक्त्याला पुण्य-पापकर्मवशात् यथासकल्पित–यथाभिप्रेत, इष्ट लोकास नेतो. ( पुण्य-पापकर्मानुसार कर्म-ज्ञान इत्यादि साधनांचें अनुष्ठान करीत असतांना ज्याच्याविषयीं संकल्प केला होता व जो मरणसमयीं वासनारूपानें पुनः अभिव्यक्त झाला आहे त्या लोकास म्हणजे देवादि शरीरास पोंचवितो. ) १०.

**श्रुतिः—य एवं विद्वान्प्राणं वेद । न हास्य प्रजा हीयतेऽमृतो भवति तदेष श्लोकः ॥ ११ ॥**

**अर्थ**—जो कोणी असें जाणणारा प्राणाला जाणतो त्याची प्रजा विच्छिन्न होत नाहीं व मरणोत्तर अमृत होतो. म्ह० प्राणाच्या सायुज्यास प्राप्त होतो. या अर्थी हा पुढील मंत्र आहे. ११.

**भाष्यं—यः कश्चिदेवं विद्वान्यथोक्तविशेषणैर्विशिष्टमुत्पत्त्यादिभिः प्राणं वेद जानाति तस्येदं फलमैहिकमामुष्मिकं चोच्यते । न हास्य नैवास्य विदुषः प्रजा पुत्रपौत्रादिलक्षणा हीयते छिद्यते । पतिते च शरीरे प्राणसायुज्यतयाऽमृतोऽमरणधर्मा भवति तदेतस्मिन्नर्थे संक्षेपाभिधायक एष श्लोको मन्त्रो भवति ॥११॥**

**भाष्यार्थ**—(याप्रमाणें प्राणाच्या स्वरूपाचें निर्धारण निश्चय करून श्रुति त्याच्या उपासनेचें विधान करिते–)=जो कोणी असें जाणणारा विद्वान् पूर्वोक्त उत्पत्त्यादि विशेषणांनीं विशिष्ट असलेल्या प्राणास जाणतो त्याला हें ऐहिक व आमुष्मिक–पारलौकिक फल सांगितलें जातें–' न हास्य० '–या विद्वानाची पुत्र-पौत्रादिलक्षण प्रजा ( संतति ) विच्छिन्न होत नाहीं. त्याच्या शरीराचा पात झाल्यावर ( म्ह० मरणोत्तर ) प्राणसायुज्यतेनें तो अमरण धर्मवान् होतो ( या श्रुतींत सांगितलेलें अमृतत्व मुख्य नव्हे. तर तें प्राणसायुज्यच होय. पण हें सुद्धां फल सकाम उपासकाला मिळतें. निष्कामाला चित्ताचें ऐकाग्र्य हेंच फल प्राप्त होतें, आणि त्या चित्तशुद्धीच्या द्वारा त्याला क्रमानें मुख्यच अमृतत्व मिळतें. )=याचविषयीं संक्षेपतः वर्णन करणारा, हा असा श्लोक मंत्र आहे. ११.

**श्रुतिः—उत्पत्तिमायतिं स्थानं विभुत्वं चैव पञ्चधा । अध्यात्मं चैव प्राणस्य विज्ञायामृतमश्नुते विज्ञायामृतमश्नुत इति ॥ १२ ॥**

**इत्यथर्ववेदीयप्रश्नोपनिषदि तृतीयः प्रश्नः ॥ ३ ॥**

**अर्थ**—परमात्म्या प्राणाची उत्पत्ति, शरीरांत आगमन, स्थिति, पाय्वादि स्थानांवरील स्वामित्व, प्राणाच्या वृत्तीचें पांच प्रकारें स्थापन, बाह्य व अध्यात्म अवस्थान, जाणून पुरुष अमृतत्वाचा अनुभव घेतो. १२. ( ३ )

**भाष्यं—उत्पत्तिं परमात्मनः प्राणस्याऽऽयतिमागमनं मनोकृतेनास्मिञ्शरीरे स्थानं स्थितिं च पायूपस्थादिस्थानेषु विभुत्वं च स्वाम्यमेव सम्राडिव प्राणवृत्तिभेदानां पञ्चधा स्थापनम्। बाह्यमादित्यादिरूपेणाध्यात्मं चैव चक्षुराद्याकारेणावस्थानं विज्ञायैवं प्राणममृतमश्नुत इति विज्ञायामृतमश्नुत इति द्विर्वचनं प्रश्नार्थपरिसमाप्त्यर्थम्॥ १२॥**

**इति श्रीमत्परमहंसपरिव्राजकाचार्यश्रीमद्गोविन्दभगवत्पूज्यपादशिष्यश्रीमच्छंकरभगवतः कृतौ प्रश्नोपनिषद्भाष्ये तृतीयः प्रश्नः॥३॥**

**भाष्यार्थ**—परमात्म्यापासून प्राणाची उत्पत्ति, मनःसंकल्पानें या शरीरांत येणें, पायु-उपस्थादि स्थानीं स्थिति, विभुत्व–स्वामित्व–सम्राडाप्रमाणें प्राणवृत्तीचें पंचधा स्थापन, आदित्यादिरूपानें बाह्य व चक्षुरादिरूपानें अध्यात्म अवस्थान, इत्यादि प्रकारें प्राणाला जाणून पुरुष अमृतत्वाचा अनुभव घेतो.–'विज्ञायामृतमश्नुते' या पदांची आवृत्ति प्रश्नार्थाच्या परिसमाप्तीसाठीं आहे. १२.

इति प्रश्नोपनिषद्भाष्यार्थाचा तिसरा प्रश्न समाप्त.

---

## अथ चतुर्थः प्रश्नः

**श्रुतिः—अथ हैनं सौर्यायणी गार्ग्यः पप्रच्छ।**

**अर्थ**—नंतर पिप्पलादांना सौर्यायणी गार्ग्य विचारता झाला.

**भाष्यं—अथ हैनं सौर्यायणी गार्ग्यः पप्रच्छ। प्रश्नत्रयेणापरविद्यागोचरं सर्वं परिसमाप्य संसारं व्याकृतविषयं साध्यसाधनलक्षणमनित्यम्। अथेदानीमसाध्यसाधनलक्षणमप्राणममनोगोचरमतीन्द्रियविषयं शिवं शान्तमविकृतमक्षरं सत्यं परविद्यागम्यं पुरुषाख्यं सबाह्याभ्यन्तरमजं वक्तव्यमित्युत्तरं प्रश्नत्रयमारभ्यते॥**

**भाष्यार्थ**—(येणेंप्रमाणें कर्म व उपासना यांची गति श्रवण करून विरक्त झालेल्या, प्राणोपासनेनें चित्ताचें ऐकाग्र्य व शुद्धि यांनीं युक्त असलेल्या व त्यामुळेंच साधनचतुष्टयसंपन्न, अशा मुख्य अधिकाऱ्याला पर विद्येचा उपदेश करण्यासाठीं श्रुति पुढील तीन प्रश्नांचा आरंभ करिते–)=त्यानंतर त्याला सौर्यायणी गार्ग्य विचारूं लागला. मागील तीन प्रश्नांनीं अपर विद्याविषयक व्याकृताश्रय, साध्यसाधनलक्षण सर्व अनित्य संसार प्रतिपादिला. ( अपर विद्या म्हणजे कर्म व उपासना. तिच्या योगानें प्राप्त होणारा, कार्यरूप सृष्टीच्या अन्तर्गत, साध्य-साधनसंबंधानें अभिव्यक्त–उत्पन्न होणारा व त्या-

मुळेंच अनित्य, अशा संसारात्मक तत्त्वाचें वर वर्णन केलें. पण आतां पुढें ज्याचें वर्णन करावयाचें आहे तो आत्मा मात्र तसा नाहीं, असें भाष्यकार सुचवितात-)=आतां साध्य-साधनसंबंधानें लक्षित न होणाऱ्या, प्राणरहित, मनाचा विषय न होणाऱ्या, अतींद्रिय ( इंद्रियांचा अविषय, अकार्य ), सुखरूप, सर्व अनर्थशून्य, अविकृत, अक्षर, सत्य, पर विद्याविषय, पुरुषाख्य व सबाह्याभ्यंतर अज तत्त्वाचें वर्णन करावें म्हणून या पुढील तीन प्रश्न आरंभिलेले आहेत.

**भाष्यं—तत्र सुदीप्तादिवाग्नेर्यस्मात्परादक्षरात्सर्वे भावा विस्फुलिङ्गा इव जायन्ते तत्र चैवापियन्तीत्युक्तं द्वितीये मुण्डके । के ते सर्वे भावा अक्षराद्वि-भज्यन्ते । कथं वा विभक्ताः सन्तस्तत्रैवापियन्ति । किंलक्षणं वा तदक्षरमिति । एतद्विवक्षयाऽधुना प्रश्नानुद्भावयति--**

**भाष्यार्थ**—' चांगल्या पेटलेल्या अग्नीपासून जसे विस्फुलिंग ( किटाळें ) त्याप्रमाणें ज्या पर अक्षरापासून सर्व भाव उत्पन्न होतात व त्यांतच लीन होतात ' असें दुसऱ्या मुंडकांत सांगितलें आहे. ते अक्षरापासून विभाग पावणारे सर्व भाव कोणते ? व ते विभक्त होऊन त्यांतच लीन कसे होतात ! त्या अक्षराचें लक्षण काय आहे ? हें सांग-ण्याच्या इच्छेनें वेद आतां पुढील प्रश्नांस उत्थापित करीत आहे.

**श्रुतिः--भगवन्नेतस्मिन्पुरुषे कानि स्वपन्ति कान्यस्मिञ्जाग्रति कतर एष देवः स्वप्नान्पश्यति कस्यैतत्सुखं भवति कस्मिन्नु सर्वे संप्रतिष्ठिता भवन्तीति ॥ १ ॥**

**अर्थ**—भगवन्, या शरीररूप पुरुषांत कोणतीं इंद्रियें निजतात; कोणतीं जाग-तात; यांतील कोणता देव स्वप्नें पाहतो ? हें सुख कोणाला होतें ? व सर्व देव कोणा-मध्यें बरें उत्तमप्रकारें प्रतिष्ठित होतात. १.

**भाष्यं--भगवन्नेतस्मिन्पुरुषे शिरःपाण्यादिमति कानि करणानि स्वपन्ति स्वापं कुर्वन्ति स्वव्यापारादुपरमन्ते कानि चास्मिञ्जाग्रति जागरणमनिद्रावस्थां स्वव्यापारं कुर्वन्ति । कतरः कार्यकरणलक्षणयोरेष देवः स्वप्नान्पश्यति । स्वप्नो नाम जाग्रद्दर्शनान्निवृत्तस्य जाग्रद्वदन्तःशरीरे यद्दर्शनम् । तत्किं कार्यलक्ष-णेन देवेन निर्वर्त्यते किंवा करणलक्षणेन केनचिदित्यभिप्रायः ॥**

**भाष्यार्थ**--भगवन्, या शिर, हात, पाय इत्यादिकांनीं युक्त असलेल्या पुरुषा-मध्यें कोणतीं इंद्रियें निजतात ? स्वाप करितात ? आपल्या व्यापारापासून उपरत होतात ? तशींच यांत कोणतीं इंद्रियें जागतात ? जागरण म्हणजे अनिद्रावस्था; म्हणजे तीं आपापला व्यापार करितात ? या कार्य-करणलक्षण ( शरीरेंद्रियरूप ) उभयविध

देवांतील कोणता देव स्वप्नांस पाहतो ? स्वप्न म्हणजे जाग्रद्दर्शनापासून निवृत्त झालेल्या पुरुषानें जाग्रत्प्रमाणेंच शरीरांत विषयदर्शन करणें. तें कार्य कोणा कार्यलक्षण देवाकडून केलें जातें, कीं कोणा करणलक्षण देवाकडून ? असा या प्रश्नाचा अभिप्राय आहे.

**भाष्यं—उपरते च जाग्रत्स्वप्नव्यापारे यत्प्रसन्नं निरायासलक्षणमनाबाधं सुखं कस्यैतद्भवति । तस्मिन्काले जाग्रत्स्वप्नव्यापारादुपरताः सन्तः कस्मिन्नु सर्वे सम्यगेकीभूताः संप्रतिष्ठिताः । मधुनि रसवत्समुद्रं प्रविष्टनद्यादिवच्च विवेकानर्हाः प्रतिष्ठिता भवन्ति संगताः संप्रतिष्ठिता भवन्तीत्यर्थः ॥**

**भाष्यार्थ**—पुढें जाग्रत् व स्वप्नव्यापार उपरत ( शांत ) झाला असतां ( अनुभवास येणारें व मी एवढा वेळ अगदीं सुखानें निजलों होतों, या जागरांतील परामर्शास कारण होणारें-)=जें प्रसन्न ( विषयमलरहित, ) निरायासलक्षण ( नुसत्या विक्षेपाच्या अभावानेंच अभिव्यक्त होणारें ), व अनाबाध ( वातरहित प्रदेशांत ठेवलेल्या दीपाच्या प्रकाशाप्रमाणें विनाशरहित, सत्य, आत्मस्वरूप ) सुख तें कोणाला होतें ? त्यावेळीं जाग्रत्-स्वप्नव्यापारापासून उपरत झालेले सर्व भाव कशामध्यें बरें अगदीं तादात्म्य पावून, ( विलय पावून ) राहिलेले आहेत; मधांतील रसाप्रमाणें व समुद्रांत प्रविष्ट झालेल्या नद्यादिकांप्रमाणें पृथक् करितां न येण्यासारख्या अवस्थेस प्राप्त होत्साते प्रतिष्ठित होतात ? सर्व भाव एकमेकांशीं संगत होऊन, मिळून जाऊन कोठें बरें चांगल्या रीतीनें प्रतिष्ठित होतात ? असा भावार्थ.

**भाष्यं—ननु न्यस्तदात्रादिकरणवत्स्वव्यापारादुपरतानि पृथक्पृथगेव स्वात्मन्यवतिष्ठन्त इत्येतद्युक्तं कुतः प्राप्तिः सुषुप्तपुरुषाणां करणानां कस्मिंश्चिदेकीभावगमनाशङ्कार्थाः प्रष्टुः ॥**

**भाष्यार्थ**—( वादी )-पुरुषानें ज्यांचा त्याग केला आहे, ज्यांना खालीं ठेविलें आहे अशा कुऱ्हाड, सुरी, इत्यादि साधनांप्रमाणें आपापल्या व्यापारापासून उपरत झालेलीं इंद्रियादि स्वतःच्या स्वरूपांत पृथक् पृथक्च राहतात, असें समजणें युक्त आहे. मग असें असतांना निजलेल्या पुरुषांच्या इंद्रियांचा कोठें तरी कोणामध्यें तरी एकीभाव होत असेल, या प्रश्नकर्त्या गार्ग्याच्या शंकेची प्राप्तिच कोठें आहे !

**भाष्यं—युक्तैव त्वाशङ्का । यतः संहतानि करणानि स्वाम्यर्थानि परतन्त्राणि च जाग्रद्विषये तस्मात्स्वापेऽपि संहतानां पारतन्त्र्येणैव कस्मिंश्चित्संगतिर्न्याय्येति तस्मादाशङ्कानुरूप एव प्रश्नोऽयम् । अत्र तु कार्यकरणसंघातो यस्मिंश्च प्रलीनः सुषुप्तप्रलयकालयोस्तद्विशेषं बुभुत्सोः स को नु स्यादिति कस्मिन्सर्वे संप्रतिष्ठिता भवन्तीति ॥ १ ॥**

**भाष्यार्थ**—( सिद्धान्ती )-प्रश्न करणाराची आशंका अगदीं योग्यच आहे. कारण जाग्रद्विषयांत संहत चक्षुरादि करणें कोणा स्वामीकरितां संघात पावलेलीं व परतंत्र असतात. यास्तव स्वापामध्येंहि-निद्रेंतहि संहत असलेल्या त्यांची पारतंत्र्यानेंच कोणाचे तरी ठिकाणीं संगति असणें न्याय्य आहे. तस्मात् हा आशंकानुरूपच प्रश्न आहे. ( जे पदार्थ संघात पावलेले असतात ते सर्व परार्थ–दुसऱ्या करितां 'हा संघातच मी' असा अभिमान बाळगणाऱ्या स्वामीकरितां असतात, असा अबाधित नियम आहे. त्यामुळें चक्षुरादि अनेकात्मक करणें संहत असल्याकारणानेंच त्यांचा स्वामी दुसरा कोणी चेतन असला पाहिजे, असें सामान्यतः ज्ञात झालें असतां प्रश्न करणाऱ्या मुनीचा 'तो कोण?' असा विशेष प्रश्न युक्तच आहे. तो मनांत असलेल्या शंकेच्या अनुरूपच आहे. )=सुषुप्त व प्रलय ( मरण ) या दोन प्रसंगीं कार्यकरणसंघात ज्याच्यामध्यें सर्वथा लीन होतो तो कोण, असा त्याला विशेषेंकरून जाणण्याची इच्छा करणाऱ्या सौर्यायणी गार्ग्याचा 'तो कोण बरें?' व 'कार्यकरणादि सर्व कोणामध्यें बरें प्रतिष्ठित होतात?' असा प्रश्न आहे १.

**श्रुतिः—तस्मै स होवाच । यथा गार्ग्य मरीचयोऽर्कस्यास्तं गच्छतः सर्वा एतस्मिंस्तेजोमण्डल एकी भवन्ति । ताः पुनः पुनरुदयतः प्रचरन्त्येवं ह वै तत्सर्वं परे देवे मनस्येकी भवति । तेन तर्ह्येष पुरुषो न शृणोति न पश्यति न जिघ्रति न रसयते न स्पृशते नाभिवदते नाऽऽदत्ते नाऽऽनन्दयते न विसृजते नेयायते स्वपितीत्याचक्षते॥**

**अर्थ**—त्यास पिप्पलाद म्हणाले—"हे गार्ग्या, ज्याप्रमाणें अस्त पावणाऱ्या सूर्याचे सर्व किरण या तेजोमंडलामध्यें एकरूप होतात व पुनः पुनः उदय पावणाऱ्या त्याचे किरण पसरतात त्याप्रमाणें तें सर्व पर देवामध्यें–मनामध्यें एकरूप होतें. त्यामुळें त्या सुषुप्तींत हा पुरुष ऐकत नाहीं, पहात नाहीं, वास घेत नाहीं, रस चाखीत नाहीं, स्पर्श करीत नाहीं, बोलत नाहीं, घेत नाहीं, आनंद भोगीत नाहीं, विष्ठात्याग करीत नाहीं व जात नाहीं. तर तो निजला आहे, असें म्हणतात. २.

**भाष्यं—तस्मै स होवाचाऽऽचार्यः । शृणु हे गार्ग्य यत्त्वया पृष्टम् । यथा मरीचयो रश्मयोऽर्कस्याऽऽदित्यस्यास्तमदर्शनं गच्छतः सर्वा अशेषत एतस्मिंस्तेजोमण्डले तेजोराशिरूप एकी भवन्ति विवेकानर्हत्वमविशेषतां गच्छन्ति मरीचयस्तस्यैवार्कस्य ताः पुनः पुनरुदयत उद्गच्छतः प्रचरन्ति विकीर्यन्ते । यथाऽयं दृष्टान्तः । एवं ह वै तत्सर्वं विषयेन्द्रियादिजातं परे प्रकृष्टे देवे द्योतनवति मनसि चक्षुरादिदेवानां मनस्तन्त्रत्वात्परो देवो मनस्तस्मिन्स्वप्नकाल एकी-**

**भवति । मण्डले मरीचिवदविशेषतां गच्छति । जिजागरिषोश्च रश्मिवन्मण्डलान्मनस एव प्रचरन्ति स्वव्यापाराय प्रतिष्ठन्ते ॥**

**भाष्यार्थ**—' तस्मै स होवाच '–आचार्य त्या प्रश्नकर्त्या मुनीला म्हणाला–" हे गार्ग्या, तूं जें विचारलेंस तें ऐक–' यथा गार्ग्य० '–ज्याप्रमाणें अस्त पावणाऱ्या –दृष्टीच्या आड जाणाऱ्या सूर्याचे सर्व किरण या तेजोराशिरूप तेजोमंडलांत एकरूप होतात; ते पृथक् पृथक् आहेत असा विवेक करितां येत नाहीं, विशेष अवस्था सोडून सामान्य अवस्थेस प्राप्त होतात, व पुन: पुन: उदय पावणाऱ्या त्याच सूर्याचे तेच किरण दश दिशांमध्यें पसरतात, ' एवं ह० '–त्याप्रमाणें–जसा हा दृष्टान्त आहे तसें तें सर्व विषय-इंद्रियादि पर सर्वोत्कृष्ट देवामध्यें–द्योतनवानामध्यें–मनामध्यें (निद्रासमयीं एकरूप होतें.) चक्षुरादि इतर देव मनस्तन्त्र–मनाच्या अधीन असल्यामुळें मन त्यांचा पर देव होय. त्या पर देवांत निद्रासमयीं एकरूप होतें. सूर्यमंडलांत जसे किरण त्याप्रमाणें स्वापकालीं मनांत इंद्रियें सामान्यभावास प्राप्त होतात आणि सूर्यमंडलापासून जसे किरण त्याप्रमाणें जागृत होण्याची इच्छा करणाऱ्या पुरुषाच्या मनापासूनच तीं सर्व आपापल्या व्यापाराकरितां निघतात.

**भाष्यं**—**यस्मात्स्वप्नकाले श्रोत्रादीनि शब्दाद्युपलब्धिकरणानि मनस्येकीभूतानीव करणव्यापारादुपरतानि तेन तस्मात्तर्हि तस्मिन्स्वापकाल एष देवदत्तादिलक्षण: पुरुषो न शृणोति न पश्यति न जिघ्रति न रसयते न स्पृशते नाभिवदते नाऽऽदत्ते नाऽऽनन्दयते न विसृजते नेयायते स्वपितीत्याचक्षते लौकिका: २**

**भाष्यार्थ**—ज्याअर्थी निद्राकालीं शब्दादि विषयांच्या उपलब्धीचीं श्रोत्रादि साधनें मनांत एकीभूतशीं होऊन आपल्या करणव्यापारापासून उपरत होतात ' तेन '–त्याअर्थी ' तर्हि '–त्या स्वापकालीं ' एष पुरुषो० '–हा देवदत्तादि पुरुष ऐकत नाहीं, पहात नाहीं, वास घेत नाहीं, रस जाणत नाहीं, स्पर्श करीत नाहीं, बोलत नाहीं, हातांनीं कांहीं घेत नाहीं, उपस्थेंद्रियानें आनंद घेत नाहीं, मलाचा त्याग करीत नाहीं व जात नाहीं; तर तो झोंप घेत आहे, असें लौकिक जन सांगतात. ( स्वप्नावस्थेंत वासनामय इंद्रियव्यापार होत असला तरी बाह्य शब्दादि श्रवण करणें, पाहणें इत्यादि व्यापाराचा अभाव असतो. यास्तव निद्राशब्दानें सुषुप्ति व स्वप्न या दोन्ही अवस्थांचें ग्रहण करावें. श्रोत्रादिकांचा एकीभाव म्हणजे आपापला व्यापार सोडून केवल मनस्तंत्र होऊन राहणें; मुख्य एकत्व नव्हे. कारण मन हीं श्रोत्रादि इंद्रियांची प्रकृति नव्हे आणि कोणत्याहि विकृतीचा प्रकृतीवांचून इतरत्र मुख्य एकीभाव संभवत नाहीं. एवढ्यासाठींच तर 'एकीभूतशीं होऊन' असें म्हटलें आहे; 'एकीभूत होऊन' असें म्हटलें नाहीं.) २

**श्रुतिः—प्राणाग्नय एवैतस्मिन्पुरे जाग्रति। गार्हपत्यो ह वा एषोऽपानो व्यानोऽन्वाहार्यपचनो यद्गार्हपत्यात्प्रणीयते प्रणयनादाहवनीयः प्राणः ॥ ३ ॥**

**अर्थ**—या शरीरनगरांत प्राणादि वायू हेच पांच अग्नी जागतात. हा अपानच गार्हपत्य अग्नि आहे. व्यान अन्वाहार्यपचन अग्नि आहे. ज्याअर्थी गार्हपत्यापासून प्रणयम केलें जातें त्याअर्थी प्रणयनामुळें आहवनीय प्राण आहे. ३.

**भाष्यं—सुप्तवत्सु श्रोत्रादिषु करणेष्वेतस्मिन्पुरे नवद्वारे देहे प्राणाग्नयः प्राणादिपञ्चवायवोऽग्नय इवाग्नयो जाग्रति। अग्निसामान्यं हि। गार्हपत्यो ह वा एषोऽपानः। कथमित्याह—यस्माद्गार्हपत्यादग्नेरग्निहोत्रकाल इतरोऽग्निराहवनीयः प्रणीयते प्रणयनात्प्रणीयतेऽस्मादिति प्रणयनो गार्हपत्योऽग्निः। तथा सुप्तस्यापानवृत्तेः प्रणीयत इव प्राणो मुखनासिकाभ्यां संचरत्यत आहवनीयस्थानीयः प्राणः। व्यानस्तु हृदयाद्दक्षिणसुषिरद्वारेण निर्गमाद्दक्षिणादिक्संबन्धादन्वाहार्यपचनो दक्षिणाग्निः ॥ ३ ॥**

**भाष्यार्थ**—(वरील ब्राह्मणखण्डांत 'कोणतीं इंद्रियें निजतात ?' या प्रश्नाचें -विषयांसह बाह्य इंद्रियें निजतात, उपरम पावतात आणि त्यामुळें जागरण हा त्यांचाच धर्म आहे, असें उत्तर देऊन आतां कोणतीं इंद्रियें जागतात, या दुसऱ्या प्रश्नाचें उत्तर येथें दिलें आहे-)=श्रोत्रादि करणें निजलीं असतां या पुरांत म्हणजे नवद्वार युक्त देहांत 'प्राणाग्नयः'-प्राणादि पांच वायू हेच कोणी अग्नी—जणुंकाय अग्नी—जागतात. [ हें प्राणांचें अग्नित्व गौण आहे, मुख्य नव्हे, हें सुचविण्याकरितां 'अग्नय इव अग्नयः'—जणुं काय अग्नी, खरे अग्नी नव्हेत, असा विग्रह केला आहे.]=आतां प्राणादि पंच वायूंच्या ठिकाणीं अग्नीचें सामान्य ( समानधर्मत्व ) कोणतें आहे, तें सांगतात-[ कारण दोन वस्तूंमध्यें समान धर्म असल्यावांचून एकीचा दुसरीशीं गौणसंबंध होत नाहीं. पुरुष व सिंह यांच्यातील शौर्य या समान धर्मामुळेंच 'हा पुरुष सिंह आहे' असा गौण प्रयोग होतो. ]=हा जो प्रसिद्ध अपान तो गार्हपत्य अग्नि आहे. तो कसा, ( कोणत्या सामान्यामुळें, म्हणून विचाराल ) तर वद सांगतो—अग्निहोत्राचे वेळीं गार्हपत्य अग्नीपासून दुसरा आहवनीय अग्नि नेला जातो व अशा रीतीनें त्याच्यापासून नेल्यामुळेंच गार्हपत्य अग्नि प्रणयन [ प्रणीयत इति ] या यौगिक नांवास पात्र होतो; त्याचप्रमाणें निजलेल्या पुरुषाच्या अपानवृत्तीपासून जणुं काय नेला जाणारा प्राण मुख व नासिका यांच्या द्वारा संचार करितो. यास्तव प्राण आहवनीयस्थानीय (आहवनीयाच्या स्थानीं असलेला) वायु आहे. व्यान तर हृदयापासून

उजव्या छिद्रद्वारानें निघत असल्यामुळें त्याचा दक्षिण दिशेशीं संबंध असतो; म्हणून अन्वाहार्यपचन दक्षिणाग्नि आहे. ३.

**श्रुतिः—यदुच्छ्वासनिश्वासावेतावाहुती समं नयतीति स समानः । मनो ह वाव यजमान इष्टफलमेवोदानः स एनं यजमानमहरहर्ब्रह्म गमयति ॥ ४ ॥**

**अर्थ**—ज्याअर्थी उच्छ्वास व निश्वास ह्या जणुं काय अग्निहोत्राच्या आहुती आहेत त्यांना साम्यानें शरीरस्थितिभावास नेतो म्हणून समान. मन हाच यजमान आहे. इष्टफलच उदान आहे. तो या यजमानाला प्रत्यहीं सुषुप्तींत ब्रह्माला पोंचवितो. ४.

**भाष्यं**—अत्र च होताऽग्निहोत्रस्य यद्यस्मादुच्छ्वासनिश्वासावग्निहोत्राहुती इव नित्यं द्वित्वसामान्यादेव त्वेतावाहुती समं साम्येन शरीरस्थितिभावाय नयति यो वायुरग्निस्थानीयोऽपि होता चाऽऽहुत्योर्नेतृत्वात् । कोऽसौ स समानः। अतश्च विदुषः स्वापोऽप्यग्निहोत्रहवनमेव । तस्माद्विद्वान्नाकर्मीत्येवं मन्तव्य इत्यभिप्रायः । सर्वदा सर्वाणि भूतानि विचिन्वन्त्यपि स्वपत इति हि वाजसनेयके। अत्र हि जाग्रत्सु प्राणाग्निषूपसंहृत्य बाह्यकरणानि विषयांश्चाग्निहोत्रफलमिव स्वर्गं ब्रह्म जिगमिषुर्मनो ह वाव यजमानो जागर्ति यजमानवत्कार्यकरणेषु प्राधान्येन संव्यवहारात्स्वर्गमिव ब्रह्म प्रति प्रस्थितत्वाद्यजमानो मनः कल्प्यते ॥

**भाष्यार्थ**—या उत्तर वाक्यानें येथें अग्निहोत्राचा होता-होमाचा कर्ता, ऋत्विक् सांगितलेला आहे. 'यत्'-ज्याअर्थी 'उच्छ्वासनिश्वासौ०'-उच्छ्वास व निश्वास जणु काय अग्निहोत्राच्या आहुती आहेत; कारण त्या दोन्हींमध्यें द्वित्व हें नित्य सामान्य आहे. ( आहवनीयांतील होमाच्या आहुती जशा दोन तसेच श्वास व निश्वासहि दोन. आणि ज्याअर्थी या दोन आहुती आहेत त्याअर्थी-)=हा अग्निस्थानीय वायुहि अग्निहोत्रांतील होमकर्त्याप्रमाणें त्यांना शरीरस्थितिभावाकरितां सम पोंचवितो त्याअर्थी आहुतींना पोंचवीत असल्यामुळें, तोच होता आहे. तो कोण ? तर तो समान. यास्तव असें जाणणाऱ्या पुरुषांचा स्वाप-निद्रा हें अग्निहोत्रहवनच आहे. तस्मात् विद्वान् अकर्मी ( कर्मरहित ) आहे, असें समजूं नये; हा याचा अभिप्राय. ( येथें तीन्हीं अवस्थांतील उच्छ्वासनिश्वासरूप प्राणांना अग्निहोत्राचें अवयवत्व जें सांगितलें आहे तें उपासनेकरितां नव्हे. कारण हें निर्विशेष आत्म्याचें प्रकरण आहे, व उपासनेचा विधिहि येथें नाहीं. येथें इंद्रियें शांत होतात व प्राण जागतात, एवढेंच सांगावयाचें आहे. तस्मात् ही त्वंपदार्थशोधनरूप ज्ञानाची स्तुतिच आहे. )=वाजसनेयकांत ( बृहदारण्यकांत ) 'वाग्विचतः प्राणाश्वतः' इत्यादि वाक्यानें सर्व प्राणव्यापारांत प्रत्येकीं

अग्निचितत्वदृष्टीचें विधान करून अशी दृष्टि करणारा पुरुष जेव्हा निजतो तेव्हांहि अर्थात् सर्वदा सर्व भूतें त्याचें अग्निचयन करितात, ( असें म्हणून त्या दृष्टीची स्तुति केली आहे. येथें मन यजमान आहे, अशी कल्पना केली जाते-)=' मनो ह वाव यजमान: '-या दर्शांत प्राणाग्नी जागत असतांना बाह्य इंद्रियें व विषय यांचा उपसंहार करून, अग्निहोत्राचें फल, असा जो स्वर्ग त्याप्रमाणें ब्रह्माला जाऊन पोंचण्याची इच्छा करणारें मन हाच यजमान जागतो. मन यजमानाप्रमाणेंच कार्य-करणांमध्यें -शरीरेंद्रियांत मुख्यत्वेंकरून उत्तम व्यवहार करीत असल्याकारणानें व यजमान जसा स्वर्गास जावयास निघतो त्याप्रमाणें ब्रह्माला पोंचण्याकरितां निघालेलें असल्यामुळें तेंच ( मनच ) यजमान आहे, अशी कल्पना केली जाते.

**भाष्यं—इष्टफलं यागफलमेवोदानो वायुः । उदाननिमित्तत्वादिष्टफलप्राप्तेः । कथम् । स उदानो मनआख्यं यजमानं स्वप्रवृत्तिरूपादपि प्रच्याव्याहरहः सुषुप्तिकाले स्वर्गमिव ब्रह्माक्षरं गमयति । अतो यागफलस्थानीय उदानः ॥४॥**

**भाष्यार्थ**—'इष्टफलमेवोदानः'-इष्टफल म्हणजे यागाचें फलच उदान वायु आहे. कारण इष्टफलाची प्राप्ति उदान वायूच्या निमित्तानें प्राप्त होणाऱ्या मरणानंतर होत असते. ( शिवाय एवढ्या करितांच नव्हे तर ' या आनंदाच्याच लेशावर अन्य--भूतें-प्राणी उपजीविका करीत असतात'- बृ.४.३.३२-अशा अर्थाची श्रुति असल्यामुळें सर्व यागाचें फल ब्रह्मात्मक आहे व उदान प्राण्याला प्रत्यहीं त्यापाशीं नेऊन पोंचवीत असतो, असेंहि सांगतात-)=इष्टफल उदानाच्या निमित्तानेंच कसें प्राप्त होतें ? म्हणून विचाराल तर सांगतों-तो उदान वायु मनःसंज्ञक यजमानास स्वप्नवृत्ति रूपापासूनहि प्रच्युत ( पृथक्, भिन्न ) करून प्रत्यहीं सुषुप्तिसमयीं स्वर्गाप्रमाणेंच अक्षर ब्रह्मास पोंचवितो. यास्तव उदान हा यागफलस्थानीय आहे. ( उदानाचा प्रचार सुषम्नानाडींतून होत असतो. यास्तव तो मनाला त्या नाडींत प्रविष्ट करून त्यांतील ब्रह्मास पोंचवितो, अशी याविषयीं उपपत्ति जाणावी ) ४.

**भाष्यं—एवं विदुषः श्रोत्राद्युपरमकालादारभ्य यावत्सुप्तोत्थितो भवति तावत्सर्वयागफलानुभव एव नाविदुषामिवानर्थायेति विद्वत्ता स्तूयते । न हि विदुष एव श्रोत्रादीनि स्वपन्ते प्राणाग्नयो वा जाग्रति जाग्रत्स्वप्नयोर्मनः स्वातन्त्र्यमनुभवदहरहः सुषुप्तं वा प्रतिपद्यते । समानं हि सर्वप्राणिनां पर्यायेण जाग्रत्स्वप्नसुषुप्तिगमनमतो विद्वत्तास्तुतिरेवेयमुपपद्यते । यत्पृष्टं कतर एष देवः स्वप्नान्पश्यतीति तदाह—**

भाष्यार्थ—याप्रमाणें विद्वानाला श्रोत्रादिकांच्या उपरमकालापासून तो निजून उठेपर्यंत सर्व यागाच्या फलाचा अनुभवच येतो. त्याची ती अवस्था अविद्वानाच्या सुषुप्त्यवस्थेप्रमाणें अनर्थास कारण होत नाहीं, असें म्हणून विद्वत्तेची स्तुति केली जात आहे. (स्वप्नांत श्रोत्रादि बाह्य इंद्रियें उपरम पावतात व प्राणच जागतात ही विद्या. जागरण हा श्रोत्रादि बाह्य इंद्रियांचा धर्म आहे, व शरीररक्षण हा प्राणाचा धर्म आहे; आत्मधर्म नव्हे. अशा रीतीनें ही विद्या त्वंपदार्थ—जीवात्म—विवेकरूप असल्यामुळें तिची स्तुत्यता उचितच आहे. विद्वानाप्रमाणें अविद्वानाचीहि ही—इंद्रियोपरम—प्राणजागररूप—दशा जरी समान आहे तरी विद्वानाप्रमाणें त्याला तिच्या विषयीं विवेक करितां येत नाहीं. यास्तव विद्वत्तेचीच स्तुति करणें उचित होय. स्वतः भाष्यकारहि तेंच सांगतात)=केवल विद्वानाचीच श्रोत्रादि इंद्रियें निजतात, प्राणाग्नि जागतात, व मन जाग्रत् आणि स्वप्न यांमध्यें स्वातंत्र्याचा अनुभव घेत प्रत्यहीं सुषुप्तास प्राप्त होतें, असें नाहीं; कारण जाग्रत्, स्वप्न व सुषुप्ति यांमध्यें पर्यायानें जाणें, हा सर्व प्राण्यांचा समान धर्म आहे. यास्तव हें (पूर्वोक्त) विद्वत्तेची स्तुतिच आहे, असें म्हणणेंच युक्त होय. आतां 'यांतील हा कोणता देव स्वप्नांस पाहतो?' असा, जो वर प्रश्न केला होता, त्याचें उत्तर देतात—

**श्रुतिः—अत्रैष देवः स्वप्ने महिमानमनुभवति । यद्दृष्टं दृष्टमनुपश्यति श्रुतं श्रुतमेवार्थमनुशृणोति देशदिगन्तरैश्च प्रत्यनुभूतं पुनः पुनः प्रत्यनुभवति दृष्टं चादृष्टं च श्रुतं चाश्रुतं चानुभूतं चाननुभूतं च सच्चासच्च सर्वं पश्यति सर्वः पश्यति ॥ ५ ॥**

**अर्थ**—जागृति व सुषुप्ति यांच्या अंतरालावस्थेंत हा देव स्वप्नांत विभूतीचा अनुभव घेतो. जें मित्र-पुत्रादि विषयजात त्यानें पूर्वी पाहिलेलें असतें त्याच्या वासनेनें वासित झालेला तो त्याच्या वासनेपासून झालेलेच पुत्र-मित्रादि पाहतो. तसेंच जें ऐकिलले असतें तेंच जणु काय ऐकितो. देश व दिशा यांमध्यें प्रत्यहीं अनुभविलेलेंच पुनः पुनः अनुभवितो; त्याचप्रमाणें दृष्ट व अदृष्ट, श्रुत व अश्रुत, अनुभविलेलें व न अनुभविलेलें, सत् व असत् इत्यादि सर्व पाहतो; प्रत्येक जीव तें पाहतो. ५.

**भाष्यं—अत्रोपरतेषु श्रोत्रादिषु देहरक्षायै जाग्रत्सु प्राणादिवायुषु प्राक्सुषुप्तिप्रतिपत्तेः । एतस्मिन्नन्तराल एष देवोऽर्करश्मिवत्स्वात्मनि संहृतश्रोत्रादिकरणः स्वप्ने महिमानं विभूतिं विषयविषयिलक्षणमनेकात्मभावगमनमनुभवति प्रतिपद्यते ॥**

**भाष्यार्थ**—' अत्र '–श्रोत्रादि इंद्रियें उपरत झालीं असतां व प्राणादि वायु देह-रक्षणार्थ जागत असतां सुषुप्ति प्राप्त होण्यापूर्वीं ( गाढ झोंप लागण्याच्या पूर्वीं ) म्हणजे जाग्रत् व सुषुप्ति या दोन अवस्थांच्या अंतरालीं 'एष देवः '–ज्यानें सूर्यकिरणांप्रमाणें आपल्या स्वरूपांत श्रोत्रादि करणांचा–इंद्रियांचा उपसंहार केला आहे तो हा देव ' स्वप्ने महिमानं० '–स्वप्नांत महिम्यास–विभूतीस–विषयविषयीरूप अनेकात्मभावगमनास अनुभवितो. स्वतः विषय होऊन त्याचा ग्राहक भोक्ताहि स्वतःच होणें, या अनेकरूपत्व-अवस्थेस प्राप्त होतो.

**भाष्यं—ननु महिमानुभवने करणं मनोऽनुभवितुस्तत्कथं स्वातन्त्र्येणानुभवतीत्युच्यते स्वतन्त्रो हि क्षेत्रज्ञः ॥**

**भाष्यार्थ**—( **वादी** )–अहोपण, मन हें अनुभव घेणाऱ्या पुरुषाचें विभूतीच्या अनुभवाचें साधन आहे. तेव्हां तें स्वातंत्र्यानें अनुभव घेतें, असें कसें म्हणतां ? कारण क्षेत्रज्ञ स्वतंत्र आहे.

**भाष्यं—नैष दोषः । क्षेत्रज्ञस्य स्वातन्त्र्यस्य मनउपाधिकृतत्वान्न हि क्षेत्रज्ञः परमार्थतः स्वतः स्वपिति जागर्ति वा । मनउपाधिकृतमेव तस्य जागरणं स्वप्नश्चेत्युक्तं वाजसनेयके-" सधीः स्वप्नो भूत्वा ध्यायतीव लेलायतीव " इत्यादि । तस्मान्मनसो विभूत्यनुभवे स्वातन्त्र्यवचनं न्याय्यमेव ॥**

**भाष्यार्थ**—त्यांत कांहीं दोष नाहीं. कारण क्षेत्रज्ञाचें स्वातंत्र्यहि मन या उपाधीमुळेंच आहे. क्षेत्रज्ञ वस्तुतः स्वतः झोंप घेत नाहीं किंवा जागत नाहीं. तर ' त्याचें जागरण किंवा स्वप्न मन-उपाधिकृतच आहे' असें वाजसनेयकांत सांगितलें आहे. 'सधीः स्वप्नो भूत्वा ध्यायतीव लेलायतीव'–बृ.४.३.७–अशी तेथील श्रुति आहे आणि ' तो बुद्धीशीं तादात्म्य पावून स्वप्न होतो व जणुं काय ध्यान करितो, शरीरचेष्टा करितो ' असा तिचा अर्थ आहे. तस्मात् विभूतीचा अनुभव घेण्यास मन स्वतंत्र आहे, असें जें सांगितलें आहे, तें न्याय्यच होय.

**भाष्यं—मनउपाधिसहितत्वे स्वप्नकाले क्षेत्रज्ञस्य स्वयंज्योतिष्ट्वं बाध्येतेति केचित् । तन्न । श्रुत्यर्थापरिज्ञानकृता भ्रान्तिस्तेषाम् । यस्मात्स्वयंज्योतिष्ट्वादिव्यवहारोऽप्यामोक्षान्तः सर्वोऽविद्याविषय एव मनआद्युपाधिजनितः । यत्र वा अन्यदिव स्यात्तत्रान्योऽन्यत्पश्येत् । मात्रासंसर्गस्त्वस्य भवति । यत्र त्वस्य सर्वमात्मैवाभूत्तत्केन कं पश्येत् " इत्यादिश्रुतिभ्यः । अतो मन्दब्रह्मविदामेवेयमाशङ्का न त्वेकात्मविदाम् ॥**

**भाष्यार्थ**--पण ' स्वप्नकाल मन-उपाधियुक्त आहे, असें म्हटल्यास क्षेत्रज्ञाचें श्रुतिप्रोक्त स्वयंप्रकाशत्व बाधित होईल ' असें कित्येक म्हणतात. पण तें बरोबर नाहीं; कारण तसें म्हणणें, ही त्यांना श्रुतीच्या अर्थाचें परिज्ञान नसल्यामुळें झालली भ्रान्ति आहे. कारण मोक्षापर्यंत मन-आदि उपाधिजनित स्वयंज्योतिष्ट्वादि सर्वहि व्यवहार अविद्याविषयच आहे. याविषयीं 'जेव्हां तें आत्मतत्त्व अन्यसें (स्वरूपाहून भिन्नसें) होतें तेव्हां अन्य झालेला तो आपल्याहून निराळया अनात्मवर्गाला पाहतो '–बृ.२.४.१४–'परंतु याचा दृश्याशीं असंसर्ग असतो.' (अर्थात् आत्मा स्वयंज्योति आहे, हा बोधनव्यवहार जड विषयांच्या अपेक्षेनेंच होत असतो. कारण तें जड वेद्य व त्याच्या ज्ञानाचें मन-आदि साधन हीं दोन्ही असलीं तरच आत्म्याच्या स्वयंप्रकाशत्वाचा बोध करितां येणें शक्य आहे. त्याच्या अभावीं तो करितां येत नाहीं. द्वितीय तत्त्वाचा द्वैताचा अभाव झाला असतां व्यवहाराचाहि लोप होतो. सुषुप्तींत दृश्याचा असंसर्ग असल्यामुळेंच विशेष विज्ञान होत नाहीं. )='जेव्हां या पुरुषाच्या दृष्टीनें सर्व आत्माच होतो तेव्हां तो कोणत्या साधनानें कोणाला पाहणार'–बृ.२.४.१४–अशा अर्थाच्या अनेक श्रुति याविषयीं प्रमाण आहेत. यास्तव ' क्षेत्रज्ञ स्वतंत्र असून मन हें त्याचें अनुभवसाधन आहे ' अशी ही मंद ब्रह्मवेत्त्यांचीच आशंका आहे. एकात्मवेत्त्यांना अशी आशंका कधीं येणार नाहीं.

**भाष्यं--नन्वेवं सति " अत्रायं पुरुषः स्वयंज्योतिः " इति विशेषणमनर्थकं भवति । अत्रोच्यते । अत्यल्पमिदमुच्यते " य एषोऽन्तर्हृदय आकाशस्तस्मिञ्शेत " इत्यन्तर्हृदयपरिच्छेदे सुतरां स्वयंज्योतिष्ट्वं बाध्येत ॥**

**भाष्यार्थ**—(वादी–) पण असें जर म्हटलें तर ' अत्रायं पुरुषः स्वयंज्योतिः'–बृ.४.३.१४–या श्रुतिवाक्यांतील 'अत्र' म्हणजे या स्वप्नावस्थेंत हें विशेषण अनर्थक होतें. (सिद्धान्ती–)याचेंहि उत्तर सांगतों–पण हें तर तुमचें म्हणणें अगदींच थोडें आहे. कारण 'य एषोऽन्तर्हृदय आकाशस्तस्मिञ्शेते ' अशी 'हा जो हृदयांत आकाश आहे यांत तो शयन करितो ' या अर्थाची श्रुति आहे. त्यामुळें आत्म्याचा अंतर्हृदयानें परिच्छेद झाला असतां तर त्याचें स्वयंज्योतिष्ट्व सर्वथा बाधित होईल.

**भाष्यं—सत्यमेवमयं दोषो यद्यपि स्यात्स्वप्ने केवलतया स्वयंज्योतिष्ट्वेनार्धं तावदपनीतं भारस्येति चेन्न । तत्रापि "पुरीतति नाडीषु शेते" इति श्रुतेः पुरीतति नाडीसंबन्धात्तत्रापि पुरुषस्य स्वयंज्योतिष्ट्वेनार्धभारापनयाभिप्रायो मृषैव ॥**

**भाष्यार्थ**—(वादी)–हा दोष येईल, हें जरी खरेंच आहे तरी स्वप्नांत मनाच्या अभावामुळें स्वयंज्योतिष्ट्वानें ( स्वयंप्रकाशत्वानें ) अर्धा तर भार ( प्रतिबंध ) घालविला, असें होईल. ( बाकीचा अर्धा भार सुषुप्तींत निवृत्त होऊन सवाचा बाध

होईल. सिद्धान्ती)-ही आशाहि व्यर्थ आहे. कारण 'पुरीतति नाडी-मध्यें शयन करितो' अशी श्रुति असल्यामुळे सुषुप्तांतहि त्याचा पुरीतति नाडीशीं संबंध असतो. यास्तव स्वप्नांतहि पुरुषाच्या स्वयंज्योतिष्ट्वानें अर्धा भार कमी होतो, हा अभिप्राय व्यर्थच आहे. ( कारण सुषुप्तांत खरोखरच जर सर्व भार गेला असता तर स्वप्नांत अर्धभाराचा निरास होतो, हें म्हणणें युक्त झालें असतें. पण तसें मुळीं होतच नाहीं. सुषुप्तांत सर्वाभावाचा आश्रय करूनहि यथार्थ बोधन संभवत नाहीं. तथेंहि बहु प्रतिबंधक विद्यमान असतो. )

**भाष्यं—कथं तर्ह्यत्रायं पुरुषः स्वयंज्योतिरिति । अन्यशाखात्वादनपेक्षा सा श्रुतिरिति चेन्न । अर्थैकत्वस्येष्टत्वादेको ह्यात्मा सर्ववेदान्तानामर्थो विजिज्ञापयिषितो बुभुत्सितश्च । तस्माद्युक्ता स्वप्न आत्मनः स्वयंज्योतिष्ट्वोपपत्तिर्वक्तुम् । श्रुतेर्यथार्थतत्त्वप्रकाशकत्वात् ॥**

**भाष्यार्थ**—(वादी–)तर मग 'अत्रायं पुरुषः स्वयंज्योतिः' असें कसें म्हटलें आहे? ( या वाक्यांतील 'अत्र' या विशेषणाची गति तुम्हांला सांगितली पाहिजे, असा भावार्थ. मध्यस्थ–)=अहो ही श्रुति काण्व शाखेंतील आहे. यास्तव त्या अन्य शाखास्थ श्रुतीची येथें अपेक्षाच करूं नये, म्हणजे झालें. वादी–तसें करणें योग्य नव्हे. कारण आम्हांला एक अर्थ इष्ट आहे. एक आत्मा हाच सर्व वेदान्तांचा अर्थ लोकांच्या जिज्ञासेचा विषय व्हावा, असें श्रुतीला इष्ट असून विद्वान् यालाच जाणण्याची इच्छा करीत असतात. यास्तव स्वप्नांत आत्म्याच्या स्वयंज्योतिष्ट्वाची उपपत्ति सांगणें युक्त आहे. कारण श्रुति यथार्थ तत्त्व प्रकाशित करणारी आहे.

**भाष्यं—एवं तर्हि शृणु श्रुत्यर्थं हित्वा सर्वमभिमानं न ह्यभिमानेन वर्षशतेनापि श्रुत्यर्थो ज्ञातुं शक्यते सर्वैः पण्डितंमन्यैः । यथा हृदयाकाशे पुरीतति नाडीषु च स्वपतस्तत्संबन्धाभावात्ततो विविच्य दर्शयितुं शक्यत इत्यात्मनः स्वयंज्योतिष्ट्वं न बाध्यते । एवं मनस्यविद्याकामकर्मनिमित्तोद्भूतवासनावति कर्मनिमित्ता वासनाऽविद्ययाऽन्यद्वस्त्वन्तरमिव पश्यतः सर्वकार्यकरणेभ्यः प्रविविक्तस्य द्रष्टुर्वासनाभ्यो दृश्यरूपाभ्योऽन्यत्वेन स्वयंज्योतिष्ट्वं सुदर्पितेनापि तार्किकेण न वारयितुं शक्यते । तस्मात्साधूक्तं मनसि प्रलीनेषु करणेष्वप्रलीने च मनसि मनोमयः स्वप्नान्पश्यतीति ॥**

**भाष्यार्थ**—(सिद्धान्ती–)असें जर तूं खरोखरच समजत असशील तर आतां सर्व अभिमान सोडून श्रुतीचा अर्थ ऐक. कारण सर्व पंडितंमन्यांना अभिमानानें शंभर वर्षांनींहि श्रुत्यर्थ कळणें शक्य नाहीं. ज्याप्रमाणें–हृदयाकाशांत व पुरीतति नाडींमध्यें

आणि इतर नाड्यांत शयन करणाऱ्या आत्म्याचा त्यांच्याशीं कांहीं संबंध नसतो; त्यामुळें त्याला त्यांच्यापासून पृथक् करून दाखवितां येतें व त्यामुळेंच आत्म्याचें स्वयंज्योतिष्ट्व बाधित होत नाहीं; तसेंच, अविद्या, काम, कर्म इत्यादिकांच्या निमित्तानें ज्यामध्यें वासना उद्भवल्या आहेत अशा मनांत कर्मनिमित्त वासनारूप अविद्येच्या योगानें स्वरूपालाच भिन्न ( दुसऱ्या ) वस्तूप्रमाणें पाहणाऱ्या व सर्व कार्य-करणांहून ( शरीरेंद्रियांहून ) अगदीं –पृथक् असलेल्या द्रष्ट्याला दृश्यरूप वासनांहून अन्यत्व असल्यामुळें त्याच्या स्वयं-ज्योतिष्ट्वाचें निवारण एखाद्या महा दृप्त ( दर्पयुक्त, गर्वित ) तार्किकालाहि करितां येणें शक्य नाहीं. ( या शेवटच्या वाक्याचा स्पष्टार्थ असा–स्वप्नांत मन अविद्या, काम इत्यादिकांच्या योगानें वासनावशात् हत्ती, घोडा इत्यादिरूप होतें. जागृतींत गजादि दृश्याचा 'हें' म्हणजे स्वभिन्न अशा रूपानें जसा प्रत्यय येतो तसाच त्या मनोमय पदार्थांचाहि ' हें ' अशा रूपानेंच प्रत्यय येतो. कारण तशी प्रतीति आल्यावांचून स्वप्नांत सुखदुःखादि भोगांची सिद्धि होणें शक्य नसतें. त्या मनोमय वस्तूंना पाहणाऱ्या द्रष्ट्याचें स्वरूप त्या वस्तूंहून अगदीं पृथक् असणें युक्तच आहे, व तें दुसऱ्या कोण-त्याहि साधनावांचून ( स्वयं ) प्रकाशमान होत असल्यामुळें स्वयंज्योतिहि आहे, असें सिद्ध होतें. जागृतींत सूर्यादि कार्य-ज्योति व चक्षुरादि करण-ज्योति विद्यमान असल्यामुळें आत्म्याच्या स्वयंज्योतिष्ट्वाचें ज्ञान जरा दुर्घट असतें. पण स्वप्नांत इंद्रियांचा लय झाल्यामुळें त्यांचा अभाव असतो. त्यामुळें तें स्वयंज्योतिष्ट्व सहज कळतें. )=तस्मात् इंद्रियें मनांत लीन झालीं असून मन अविद्येंत लीन झालें नसतां मनोमय आत्मा स्वप्नांस पाहतो, असें जें म्हटलें आहे तें अगदीं निर्दोष आहे.

**भाष्यं — कथं महिमानमनुभवतीत्युच्यते । यन्मित्रं पुत्रादि वा पूर्वं दृष्टं तद्वासनावासितः पुत्रमित्रादिवासनासमुद्भूतं पुत्रं मित्रमिव वाऽविद्यया पश्यतीत्येवं मन्यते । तथा श्रुतमर्थं तद्वासनयाऽनुशृणोतीव । देशदिगन्तरैश्च देशान्तरैर्दिगन्तरैश्च प्रत्यनुभूतं पुनः पुनस्तत्प्रत्यनुभवतीवाविद्यया ॥**

**भाष्यार्थ**—आतां तो तेथें विभूतीचा अनुभव कसा घेतो, तें सांगतो–त्यानें ज्या मित्राला किंवा पुत्रादिकाला पूर्वीं पाहिलेलें असतें त्यांच्या वासनेनें वासित झालेला तो पुत्र-मित्रादिकांच्या वासनेपासून उत्पन्न झालेल्या पुत्राला किंवा मित्राला अविद्येनें जणुं काय पाहतो, असें समजलें जातें ( कारण नेत्रादिकांच्या अभावीं खरोखरच त्यांना पहाणें शक्य नसतें. )=त्याचप्रमाणें ऐकलेला अर्थ त्याच्या वासनेनें जणु काय पुनरपि ऐकतो. निरनिराळे नदीतीरादि देश व पूर्वादि दिशा यांमध्यें प्रत्यहीं अनुभविलेलें वस्तुजाल पुनः पुनः अनुभवितो, अविद्येनें जणुकाय त्याचा पुनः पुनः अनुभव घेतो.

**भाष्यं—तथा दृष्टं चास्मिञ्जन्मन्यदृष्टं च जन्मान्तरदृष्टमित्यर्थः। अत्यन्तादृष्टे वासनानुपपत्तेः। एवं श्रुतं चाश्रुतं चानुभूतं चास्मिञ्जन्मनि केवलेन मनसाऽननुभूतं च मनसैव जन्मान्तरेऽनुभूतमित्यर्थः। सच्च परमार्थोदकादि। असच्च मरीच्युदकादि। किं बहुनोक्तानुक्तं सर्वं पश्यति सर्वः पश्यति सर्वमनोवासनोपाधिः सन्नेवं सर्वकरणात्मा मनोदेवः स्वप्नान्पश्यति॥ ५॥**

**भाष्यार्थ**—त्याचप्रमाणें 'दृष्टं चादृष्टं च'–या जन्मीं पाहिलेलें किंवा अन्य जन्मीं पाहिलेलें असा भावार्थ. कारण ज्याचा कधींच अनुभव घेतलेला नसतो त्याच्याविषयीं वासना उत्पन्न होणेंहि उपपन्न नसतें. तसेंच, श्रुत व अश्रुत (या व पूर्व जन्मीं ऐकलेलें), 'अनुभूतं चाननुभूतं०'–या जन्मीं केवल मनानें अनुभविलेलें व पूर्व जन्मीं मनानेंच अनुभविलेलें, 'सत्' खरें जल, भक्ष्य इत्यादि 'असत्'–मृगजलादि, फार काय पण येथें सांगितलेलें व न सांगितलेलेंहि 'सर्वं'–सर्व, 'सर्वः'–प्रत्येक जीव पाहतो. सर्व मनोवासना हीच ज्याची उपाधि आहे असा होत्साता वर सांगितल्याप्रमाणें सर्व करणात्मा मनोदेव, स्वप्नांस पाहतो. (मनोदेव सर्व करणात्मा–इंद्रियात्मा असल्यामुळें सर्व स्वप्नांना पाहूं शकतो) ५.

**श्रुतिः—स यदा तेजसाऽभिभूतो भवति। अत्रैष देवः स्वप्नान्न पश्यत्यथ तदैतस्मिञ्शरीर एतत्सुखं भवति॥ ६॥**

**अर्थ**—तो जेव्हां तेजानें पराभूत होतो तेव्हां त्या अवस्थेंत हा देव स्वप्नांना पहात नाहीं. तेव्हां या शरीरांत हें सुख होतें. ६.

**भाष्यं—स यदा मनोरूपो देवो यस्मिन्काले सौरेण पित्ताख्येन तेजसा नाडीशयेन सर्वतोऽभिभूतो भवति तिरस्कृतवासनाद्वारो भवति तदा सह करणैर्मनसो रश्मयो हृद्युपसंहृता भवन्ति। यदा मनो दार्वग्निवदविशेषविज्ञानरूपेण कृत्स्नं शरीरं व्याप्यावतिष्ठते तदा सुषुप्तो भवति। अत्रैतस्मिन्काल एष मन-आख्यो देवः स्वप्नान्न पश्यति दर्शनद्वारस्य निरुद्धत्वात्तेजसा। अथ तदैतस्मिञ्शरीर एतत्सुखं भवति यद्विज्ञानं निराबाधमविशेषेण शरीरव्यापकं प्रसन्नं भवतीत्यर्थः॥६॥**

**भाष्यार्थ**—'स यदा०'–तो मनोरूप देव जेव्हां नाडीगत पित्ताख्य सौर (सूर्याच्या) तेजानें (व चिद्रूप ब्रह्माच्या योगानें) सर्व बाजूंनीं अभिभूत (पराभूत) होतो; वासनेंच्या अभिव्यक्तीचें द्वार, म्हणजे स्वप्नभोग देणारें कर्म जेव्हां उपरत होतें तेव्हां करणांसह मनाचे किरण (वासना) हृदयामध्यें उपसंहृत होतात; (हृदयांत एकत्र आकर्षण केले जातात.)=जेव्हां मन काष्ठांतील अग्नीप्रमाणें सामान्य चैतन्यरूपानें सर्व शरीरास व्यापून राहतें तेव्हां सुषुप्त होतो. (अशा अवस्थेस प्राप्त झालेल्या

मनालाच सुषुप्त म्हणतात. )=' अत्रैष० '-त्याकाळीं हा मनःसंज्ञक देव स्वप्नांस पहात नाहीं. कारण स्वप्नदर्शनाचें द्वार ( कर्म ) तेजाच्या योगानें निरुद्ध झालेलें असतें. ' अथ० '-त्यावेळीं या शरीरांत हें सुख होतें. ( त्यावेळीं विषय व इंद्रियें यांच्या संयोगापासून होणारें सुख संभवत नसल्यामुळें, विशेषविज्ञानरूप विक्षेपाच्या अभावीं निवात प्रदेशांतील दीपाप्रमाणें, पूर्वीहि सिद्ध असलेलेंच सुख चांगल्या रीतीनें प्रकाश पावतें. )=बाधरहित व सर्व शरीरव्यापक असें जें विज्ञान (स्वरूपसुख) तें सामान्यतः प्रसन्न होतें. (विक्षेप-दशेंतील मालिन्य सोडून स्वरूपानें व्यक्त होतें, असा याचा भावार्थ.)६

**श्रुतिः—स यथा सोम्य वयांसि वासोवृक्षं संप्रतिष्ठन्ते एवं ह वै तत्सर्वं पर आत्मनि संप्रतिष्ठते ॥ ७ ॥**

**अर्थ**—तो दृष्टान्त असा-हे शिष्या, पक्षी जसे आपल्या निवासवृक्षाकडे जावयास निघतात त्याप्रमाणें पुढें सांगितलेलें हें सर्व पर आत्म्यामध्यें जातें. ७.

**भाष्यं—एतस्मिन्कालेऽविद्याकामकर्मनिबन्धनानि कार्यकरणानि शान्तानि भवन्ति । तेषु शान्तेष्वात्मस्वरूपमुपाधिभिरन्यथा विभाव्यमानमद्वयमेकं शिवं शान्तं भवतीत्येतामेवावस्थां पृथिव्याद्यविद्याकृतमात्रानुप्रवेशेन दर्शयितुं दृष्टान्तमाह-स दृष्टान्तो यथा येन प्रकारेण सोम्य प्रियदर्शन वयांसि पक्षिणो वासार्थं वृक्षं वासोवृक्षं प्रति संप्रतिष्ठन्ते गच्छन्ति । एवं यथा दृष्टान्तो ह वै तद्वक्ष्यमाणं सर्वं पर आत्मन्यक्षरे संप्रतिष्ठते ॥ ७ ॥**

**भाष्यार्थ**—त्यावेळीं ( सुषुप्तांत ) अविद्या-काम-कर्मजन्य कार्यकरणें ( शरीर व इंद्रियें) शान्त होतात. तीं शान्त झालीं असतां (पूर्वीच्या जाग्रत्स्वप्नाख्य दोन अवस्थांमध्यें ) उपाधींच्या योगानें विपरीत भासणारें आत्मस्वरूप अद्वय, एक, शिव व शांत होतें. यास्तव पृथिवीप्रभृति अविद्याकृत मात्रांचा विवेकानें अक्षरांत प्रवेश करून ही अवस्था व्यक्त करण्याकरितां आचार्य दृष्टान्त सांगतात-' स यथा०'- तो दृष्टान्त असा-बा प्रियदर्शन शिष्या, ज्याप्रकारें पक्षी आपल्या निवासवृक्षाकडे जावयास निघतात त्याप्रकारें-त्यांत सांगितल्याप्रमाणेंच पुढें सांगितलेलें सर्व पर आत्म्यामध्यें-अक्षरांत जावयास निघतें. ७.

**श्रुतिः—पृथिवी च पृथिवीमात्रा चाऽऽपश्चाऽऽपोमात्रा च तेजश्च तेजोमात्रा च वायुश्च वायुमात्रा चाऽऽकाशश्चाऽऽकाशमात्रा च चक्षुश्च द्रष्टव्यं च श्रोत्रं च श्रोतव्यं च घ्राणं च घ्रातव्यं च रसश्च रसयितव्यं च त्वक्च स्पर्शयितव्यं च वाक्च वक्तव्यं च हस्तौ चाऽऽदातव्यं चोपस्थश्चाऽऽनन्दयितव्यं च पायुश्च विसर्जयितव्यं च**

**पादौ च गन्तव्यं च मनश्च मन्तव्यं च बुद्धिश्च बोद्धव्यं चाहंकार-श्चाहंकर्तव्यं च चित्तं च चेतयितव्यं च तेजश्च विद्योतयितव्यं च प्राणश्च विधारयितव्यं च ॥ ८ ॥**

**अर्थ**---( याचा अर्थ भाष्यावरूनच समजण्यासारखा आहे. )

**भाष्यं--किं तत्सर्वम्–पृथिवी च स्थूला पञ्चगुणा तत्कारणा च पृथिवी-मात्रा च गन्धतन्मात्रा । तथाऽऽपश्चाऽऽपोमात्रा च । तेजश्च तेजोमात्रा च । वायुश्च वायुमात्रा च । आकाशश्चाऽऽकाशमात्रा च । स्थूलानि च सूक्ष्माणि च भूतानीत्यर्थः ॥**

**भाष्यार्थ**—आतां तें सर्व म्हणजे काय तें सांगतात–' पृथिवी च पृथिवीमात्रा च' –स्थूल शब्दादि पंच गुणयुक्त पृथ्वी व तिची कारणभूत पृथिवीमात्रा म्हणजे गंध-तन्मात्रा, त्याचप्रमाणें आप व आपोमात्रा, तेज व तेजोमात्रा, वायु व वायुमात्रा, आकाश व आकाशमात्रा, म्ह० पंचीकृत स्थूल व अपंचीकृत सूक्ष्म भूतें हा याचा अर्थ.

**भाष्यं—तथा चक्षुश्चेन्द्रियं रूपं च द्रष्टव्यं च । श्रोत्रं च श्रोतव्यं च । घ्राणं च घ्रातव्यं च । रसश्च रसयितव्यं च । त्वक्च स्पर्शयितव्यं च । वाक्च वक्तव्यं च । हस्तौ चाऽऽदातव्यं च । उपस्थश्चाऽऽनन्दयितव्यं च । पायुश्च विसर्जयितव्यं च । पादौ च गन्तव्यं च । बुद्धीन्द्रियाणि कर्मेन्द्रियाणि तथा चोक्तानि । मनश्च पूर्वोक्तम् । मन्तव्यं च तद्विषयः । बुद्धिश्च निश्चयात्मिका । बोद्धव्यं च तद्विषयः । अहंकारश्चाभिमानलक्षणमन्तःकरणमहंकर्तव्यं च तद्वि-षयः । चित्तं च चेतनावदन्तःकरणम् । चेतयितव्यं च तद्विषयः । तेजश्च त्व-गिन्द्रियव्यतिरेकेण प्रकाशविशिष्टा या त्वक्तया निर्भास्यो विषयो विद्योतयि-तव्यम् । प्राणश्च सूत्रं यदाचक्षते तेन विधारयितव्यं संग्रथनीयं सर्वं हि कार्य-करणजातं पारार्थ्येन संहतं नामरूपात्मकमेतावदेव ॥ ८ ॥**

**भाष्यार्थ**—त्याचप्रमाणें ' चक्षु ' इंद्रिय व ' द्रष्टव्यं ' ( पाहण्यास योग्य ) रूप, ' श्रोत्रं ' इंद्रिय व श्रोतव्य शब्द, घ्राण–इंद्रिय व घ्रातव्य गंध, रसना इंद्रिय व रस-यितव्य रसविषय, त्वक् व स्पर्शयितव्य स्पर्श, वाक् इंद्रिय व वक्तव्य वचन, हात व आदातव्य ( ग्राह्य ) पदार्थ, उपस्थ व आनन्दयितव्य, पायु व विसर्जयितव्य मल, पाय व गन्तव्य प्रदेश, अर्थात् ज्ञानेंद्रियें व कर्मेन्द्रियें सांगितलीं. पूर्वोक्त मन व त्याचा मंतव्य विषय, निश्चयात्मिका बुद्धि व तिचा बोधव्य विषय, अहंकार–अभिमानलक्षण अंतःकरण व त्याचा अहंकर्तव्य विषय, चित्त ( चेतनायुक्त अंतःकरण ) व त्याचा चेतयितव्य विषय, तेज म्हणजे त्वागींद्रियाहून भिन्न प्रकाशविशिष्ट त्वचा व ' विद्योत-

यितव्य '–तिच्या प्रकाशानें भासमान होणारा विषय–धर्म, सूत्र म्हणून ज्याला म्हणतात तो प्राण व त्याच्या योगानें धारण करण्यास, ग्रथन करण्यास योग्य असलेलें (हें सर्व पर आत्म्यामध्यें जावयास निघतें. पृथ्वीपासून विधारयितव्यापर्यंत आत्मव्यतिरिक्त व त्याच्या उपाधिभूत, असें हें सर्व सांगितलें आहे, असें भाष्यकार म्हणतात–)=पर आत्म्याकरितां संहत झालेलें–संघात पावलेलें सर्व नाम-रूपात्मक कार्यकरणजात कार्यतें एवढेंच आहे. ८.

**श्रुतिः—एष हि द्रष्टा स्प्रष्टा श्रोता घ्राता रसयिता मन्ता बोद्धा कर्ता विज्ञानात्मा पुरुषः स परेऽक्षर आत्मनि संप्रतिष्ठते ॥ ९ ॥**

**अर्थ**—हाच द्रष्टा, स्प्रष्टा–स्पर्श करणारा, श्रोता, घ्राता–वास घेणारा, रस चाखणारा, मनन करणारा, जाणणारा, कर्ता, विज्ञानात्मा पुरुष आहे. तो पर अक्षर आत्म्यामध्यें चांगल्या प्रकारें प्रतिष्ठित होतो. ९.

**भाष्यं—अतः परं यदात्मरूपं जलसूर्यकादिवद्भोक्तृत्वकर्तृत्वेनेहानुप्रविष्टम्–एष हि द्रष्टा स्प्रष्टा श्रोता घ्राता रसयिता मन्ता बोद्धा कर्ता विज्ञानात्मा विज्ञानं विज्ञायतेऽनेनेति करणभूतं बुद्ध्यादीदं तु विजानातीति विज्ञानं कर्तृकारकरूपं तदात्मा तत्स्वभावो विज्ञातृस्वभाव इत्यर्थः । पुरुषः कार्यकरणसंघातोक्तोपाधिपूर्णत्वात्पुरुषः । स च जलसूर्यकादिप्रतिबिम्बस्य सूर्यादिप्रवेशवज्जगदाधारशेषे परेऽक्षर आत्मनि संप्रष्ठिते ॥ ९ ॥**

**भाष्यार्थ**—आतां या पुढें जें आत्मस्वरूप जलांतील सूर्याच्या प्रतिबिंबाप्रमाणें भोक्तृत्व-कर्तृत्वरूपानें या कार्यकरणसंघातांत प्रविष्ट झालें आहे (त्याचें–त्या उपहित स्वरूपाचें–वर्णन करितात–)=हाच द्रष्टा, स्प्रष्टा–स्पर्श करणारा, श्रोता, घ्राता–वास घेणारा, रसयिता–रस घेणारा, मन्ता–मनन करणारा, बोद्धा–जाणणारा, कर्ता, विज्ञानात्मा–विज्ञान म्हणजे 'विज्ञायते अनेन इति'–ज्यानें जाणलें जातें तें ज्ञानसाधनभूत बुद्ध्यादि, पण हें ' विजानाति इति '–जें जाणतें तें विज्ञान–कर्तृकारकरूप; तदात्मा तत्स्वभाव विज्ञातृस्वभाव, असा याचा भावार्थ. 'पुरुषः'–कार्यकरणसंघातरूप उक्त उपाधीमध्यें पूर्ण असल्यामुळें पुरुष होय; ' स परे० '–जल या उपाधीचा नाश झाला असतां त्यांतील सूर्याचें प्रतिबिंब जसें सूर्यबिंबांत प्रवेश करितें–म्हणजे तें उपहित असल्यामुळें उपाधीच्या अभावीं विद्यमान नसतें त्याप्रमाणें तो द्रष्टा, श्रोता इत्यादि नांवाचा पुरुष जगदाधारशेष, पर, अक्षर आत्म्यामध्यें प्रवेश करितो. ९.

**श्रुतिः—परमेवाक्षरं प्रतिपद्यते स यो ह वै तदच्छायमशरीरमलोहितं शुभ्रमक्षरं वेदयते यस्तु सोम्य । स सर्वज्ञः सर्वो भवति । तदेष श्लोकः ॥१०॥**

**अर्थ**--तो जो त्या अच्छाय, अशरीर, अलोहित, शुभ्र अक्षराला जाणतो तो हे शिष्या, पर अक्षरालाच प्राप्त होतो. तो सर्वज्ञ सर्व होतो. या अर्थी हा श्लोक आहे. १०.

**भाष्यं--तदेकत्वविदः फलमाह--परमेवाक्षरं वक्ष्यमाणविशेषणं प्रतिपद्यत इत्येतदुच्यते । स यो ह वै तत्सर्वैषणाविनिर्मुक्तोऽच्छायं तमोवर्जितम् । अशरीरं नामरूपसर्वोपाधिशरीरवर्जितम् । अलोहितं लोहितादिसर्वगुणवर्जितम् । यत एवमतः शुभ्रं शुद्धम् । सर्वविशेषणरहितत्वादक्षरम् । सत्यं पुरुषाख्यम् । अप्राणममनोगोचरम् । शिवं शान्तं सबाह्याभ्यन्तरमजं वेदयते विजानाति यस्तु सर्वत्यागी सोम्य स सर्वज्ञो न तेनाविदितं किंचित्संभवति । पूर्वमविद्ययाऽसर्वज्ञ आसीत्पुनर्विद्ययाऽविद्यापनये सर्वो भवति तदा । तत्तस्मिन्नर्थ एष श्लोको मन्त्रो भवति उक्तार्थसंग्राहकः ॥ १० ॥**

**भाष्यार्थ**--( याप्रमाणें जाग्रदादि अवस्था हा मनाचा धर्म आहे, असें सांगून अवस्थातीत तुर्यात्म्याचा अनुवाद केला, व त्याचें अक्षर ब्रह्माशीं ऐक्य आहे, असें अगोदर सांगून-)=आतां त्यांचें ऐक्य जाणणाऱ्या पुरुषाला कोणतें फल मिळतें तें सांगतात-' परमेवाक्षरं प्रतिपद्यते '-ज्याचीं विशेषणें पुढें सांगावयाचीं आहेत त्या पर अक्षरालाच ज्ञानी प्राप्त होतो, असें येथें सांगितलें जातें. ' स यो ह वै '-जो एखादा फार दुर्लभ अधिकारी, सर्व एषणांपासून मुक्त झालेला-अति विरक्त होऊन त्या अच्छाय-तमोरहित, अशरीर-नामरूपादि सर्व उपाधिभूत शरीररहित, अलोहित-लोहितादि सर्व गुणरहित-अर्थात् कारण, सूक्ष्म व स्थूल हीं शरीरें व जाग्रत्, स्वप्न व सुषुप्ति या तीन अवस्था यांनीं रहित असलेलें-आणि असें असल्यामुळेंच ' शुभ्रं '-शुद्ध, सर्वविशेषणरहित असल्यामुळें अक्षर, सत्य-पुरुषसंज्ञक, प्राणरहित, मनाचा विषय न होणारें, शिव, शान्त व सबाह्य-अभ्यन्तर अज अशा ब्रह्माला जाणतो; हे प्रियदर्शन शिष्या, जो सर्वत्यागी पूर्वोक्त तत्त्व जाणतो, तो सर्वज्ञ होतो. त्यानें ज्याला जाणलें नाहीं, असें या जगांत कांहीं संभवत नाहीं. परंतु असें जाणण्यापूर्वी जो द्रष्टा, स्प्रष्टा इत्यादि संज्ञक उपहित आत्मा अविद्येनें असर्वज्ञ असतो तोच पुनः विद्येनें अविद्येचा अपनय-निरास केला असतां सर्वज्ञ व सर्व होतो. याच अर्थी-पूर्वोक्त अर्थाचा संग्रह करणारा ' विज्ञानात्मा सह देवैश्च सर्वैः० '-हा पुढील मंत्र आहे. ( मुंडकोपनिषदांतील ' हे भगवन्, कोणाला विशेष प्रकारें जाणलें असतां हें सर्व विज्ञात होतें ' या प्रश्नाचें उत्तर येथें दिलें आहे. एका अद्वितीय आत्मतत्त्वाला जाणलें असतां सर्व ज्ञात होतें. त्यानंतर ज्ञातव्य कांहीं रहात नाहीं. ) १०.

**श्रुतिः—विज्ञानात्मा सह देवैश्च सर्वैः प्राणा भूतानि संप्रतिष्ठन्ति यत्र ।**
**तदक्षरं वेदयते यस्तु सोम्य स सर्वज्ञः सर्वमेवाऽऽविवेशेति ॥११॥**
**इत्यथर्ववेदीयप्रश्नोपनिषदि चतुर्थः प्रश्नः ॥ ४ ॥**

**अर्थ**—विज्ञानात्मा, अग्न्यादि सर्व देवांसह प्राण व भूतें ज्यांत संप्रतिष्ठित होतात, त्या अक्षराला हे सोम्य, जो जाणतो तो सर्वज्ञ सर्वांतच प्रवेश करितो. ११.

**भाष्यं—विज्ञानात्मा सह देवैश्चाग्न्यादिभिः प्राणाश्चक्षुरादयो भूतानि पृथिव्यादीनि संप्रतिष्ठन्ति प्रविशन्ति यत्र यस्मिन्नक्षरे तदक्षरं वेदयते यस्तु सोम्य प्रियदर्शन स सर्वज्ञः सर्वमेवाऽऽविवेशाऽऽविशतीत्यर्थः ॥ ११ ॥**

**इति श्रीमत्परमहंसपरिव्राजकाचार्यश्रीमद्गोविन्दभगवत्पूज्यपादशिष्य-श्रीमच्छंकरभगवतः कृतौ प्रश्नोपनिषद्भाष्ये चतुर्थः प्रश्नः ॥ ४ ॥**

**भाष्यार्थ**—वर सांगितलेला विज्ञानात्मा ( विज्ञातृस्वभाव ), अग्नि, सूर्य, इत्यादि सर्व देवांसह चक्षुरादि प्राण व पृथिव्यादि भूतें हीं सर्व ज्या अक्षरांत 'संप्रतिष्ठन्ति'—प्रवेश करितात त्या अक्षराला, हे सोम्य ( प्रियदर्शन ) जो जाणतो तो सर्वज्ञ सर्वांमध्येंच प्रविष्ट झाला-प्रवेश करितो, असा भावार्थ. ११.

इति प्रश्नोपनिषद्भाष्यार्थाचा चवथा प्रश्न समाप्त.

---

## अथ पञ्चमः प्रश्नः ।

**श्रुतिः—अथ हैनं शैब्यः सत्यकामः पप्रच्छ ॥**

**अर्थ**—त्यानंतर पिप्पलादांना शैब्य सत्यकाम विचारता झाला.

**भाष्यं—अथ हैनं शैब्यः सत्यकामः पप्रच्छ ॥**

**भाष्यार्थ**—( याप्रमाणें चवथ्या प्रश्नानें उत्तमाधिकाऱ्याला पदार्थशोधनपूर्वक वाक्यार्थज्ञानानें अक्षरब्रह्माची प्राप्ति होते, हें सांगून आतां वाक्यार्थज्ञानाचे जे अधिकारी नाहींत अशा मंद वैराग्यवानांना मुंडकांतील ' ओमित्येवं ध्यायत आत्मानं० ' व 'प्रणवो धनुः शरो ह्यात्मा०' ह्या मंत्रांनीं सुचविलेली ओंकाराची उपासना सांगण्याकरितां हा पांचवा प्रश्न आरंभिलेला आहे. या उपासनेच्या योगानें ब्रह्मलोकप्राप्तीच्या द्वारा क्रमानें अक्षर ब्रह्माची प्राप्ति होते. म्हणजे उपासक प्रथम ब्रह्मलोकास जातो व नंतर कल्पाच्या अंतीं ब्रह्मदेवासह-हिरण्यगर्भासह अक्षर ब्रह्मास जाऊन मिळतो.)='अथ हैनं०'-त्यानंतर पिप्पलाद आचार्याला सत्यकाम शैब्य विचारता झाला.

**श्रुतिः-स यो ह वै तद्भगवन्मनुष्येषु प्रायणान्तमोंकारमभिध्यायीत । कतमं वाव स तेन लोकं जयतीति तस्मै स होवाच ॥ १ ॥**

**अर्थ**--'भगवन्, मनुष्यांतील तो जो कोणी ( प्रसिद्ध पुरुष ) मरणपर्यंत प्रणवाचें सर्वतः ध्यान करितो तो त्या प्रणवाच्या ध्यानानें कोणत्या लोकास जिंकतो ?' तेव्हां त्याला आचार्य म्हणाले. १.

**भाष्यं--अथेदानीं परापरब्रह्मप्राप्तिसाधनत्वेनोंकारस्योपासनविधित्सया प्रश्न आरभ्यते-स यः कश्चिद्ध वै भगवन्मनुष्येषु मनुष्याणां मध्ये तदद्भुतमिव प्रायणान्तं मरणान्तं यावज्जीवमित्येतत् । ओंकारमभिध्यायीताऽऽभिमुख्येन चिन्तयेत् । बाह्यविषयेभ्य उपसंहृतकरणः समाहितचित्तो भक्त्यावेशितब्रह्मभाव ओंकारे । आत्मप्रत्ययसंतानाविच्छेदो भिन्नजातीयप्रत्ययान्तराखिलीकृतो निर्वातस्थदीपशिखासमोऽभिध्यानशब्दार्थः । सत्यब्रह्मचर्याहिंसापरिग्रहत्यागसंन्यासशौचसंतोषामायावित्वाद्यनेकयमनियमानुगृहीतः स एवं यावज्जीवव्रतधारणः । कतमं वावानेके हि ज्ञानकर्मभिर्जेतव्या लोकास्तिष्ठन्ति तेषु तेनोंकाराभिध्यानेन कतमं स लोकं जयतीति पृष्टवते तस्मै स होवाच पिप्पलादः॥१**

**भाष्यार्थ**--आतां पर ब्रह्म व अपर ब्रह्म यांच्या प्राप्तीचें साधन, या रूपानें ओंकाराच्या उपासनेचें विधान करण्याच्या इच्छेनें या प्रश्नाचा आरंभ केला जातो. 'स यो ह वै तद्भगवन्०'-मनुष्यांतील जो कोणी एखादा आश्चर्यासारखा (विरळा) पुरुष मरेपर्यंत-यावज्जीव असा इत्यर्थ; ओंकाराचें अभिध्यान करितो, अगदीं तत्पर होऊन, इंद्रियांना बाह्य विषयांपासून परतवून व शांत चित्त होऊन जो त्याचें चिंतन करितो त्याला कोणता लोक मिळतो ? ज्या ओंकारामध्यें भक्तीनें ( आदरानें ) ब्रह्मभाव आरोपित केला आहे त्यामध्यें चित्ताला स्थिर करून, आत्मप्रत्ययाचा संततपणा विच्छिन्न न करितां, निराळ्या जातीच्या प्रत्ययानें आत्मप्रत्यय अंतरित न होईल अशा रीतीनें, चित्ताला निर्वात प्रदेशांतील दीपाच्या शिखेप्रमाणें-ज्योतीप्रमाणें आत्ममय करून ठेवणें हा अभिध्यानशब्दाचा अर्थ आहे. ( या वाक्यांत 'चित्ताला स्थिर करून' येथवर धारणा व त्यापुढें ध्यान सांगितलें आहे. )=सत्य, ब्रह्मचर्य, अहिंसा, अपरिग्रह, त्याग, संन्यास, शौच, संतोष, अमायावित्व-सरळपणा इत्यादि अनेक यम-नियमांनीं अनुगृहीत असलेला जो पुरुष याप्रमाणें यावज्जीव व्रतधारण करितो तो कोणत्या लोकाला जिंकतो (संपादन करितो) ? ज्ञान (उपासना) व कर्म यांच्या योगानें जिंकण्यासारखे अनेक लोक आहेत. ओंकाराभिध्यानानें त्यांतील कोणत्या लोकाला पुरुष जिंकतो ? 'तस्मै स होवाच'-असें विचारणाऱ्या त्याला पिप्पलाद आचार्य म्हणाले. १

श्रुतिः—एतद्वै सत्यकाम परं चापरं च ब्रह्म यदोंकारः ।
तस्माद्विद्वानेतेनैवाऽऽयतनेनैकतरमन्वेति ॥ २ ॥

अर्थ—हे सत्यकामा, जो ओंकार तेंच पर व अपर ब्रह्म आहे. तस्मात् याच आलंबनानें साधक त्यांतील एका ब्रह्माला जातो. २.

**भाष्यं—एतद्वै सत्यकाम । एतद्ब्रह्म वै परं चापरं च ब्रह्म परं सत्यमक्षरं पुरुषाख्यमपरं च प्राणाख्यं प्रथमजं यत्तदोंकार एवोंकारात्मकमोंकारप्रतीकत्वात् । परं हि ब्रह्म शब्दाद्युपलक्षणानर्हं सर्वधर्मविशेषवर्जितमतो न शक्यमतीन्द्रियगोचरत्वात्केवलेन मनसाऽवगाहितुमोंकारे तु विष्णवादिप्रतिमास्थानीये भक्त्यावेशितब्रह्मभावे ध्यायिनां तत्प्रसीदतीत्येतदवगम्यते शास्त्रप्रामाण्यात्तथाऽपरं च ब्रह्म । तस्मात्परं चापरं च ब्रह्म यदोंकार इत्युपचर्यते । तस्मादेवं विद्वानेतेनैवाऽऽत्मप्राप्तिसाधनेनैवोंकाराभिध्यानेनैकतरं परमपरं वाऽन्वेति ब्रह्मानुगच्छति नेदिष्ठं ह्यालम्बनमोंकारो ब्रह्मणः ॥ १ ॥**

भाष्यार्थ—'एतद्वै सत्यकाम॰'—हे सत्यकामा, हें ब्रह्म पर व अपर असें दोन प्रकारचें आहे. पर म्हणजे सत्य, अक्षर व पुरुषसंज्ञक ब्रह्म आणि अपर म्हणजे प्रथमज प्राणसंज्ञक ( सूत्रात्मा, हिरण्यगर्भ ). पण जें पर व अपर ब्रह्म आहे तोच ओंकार होय. म्हणजे तें दोन्ही प्रकारचें ब्रह्म ओंकारात्मकच आहे. कारण ओंकार हें उभयविध ब्रह्माचें प्रतीक आहे. ( उपासनेमध्यें निकृष्ट प्रतीकाचे ठिकाणीं उत्कृष्टाची दृष्टि करावयाची असते, जशी शालग्रामाचे ठिकाणीं विष्णुदृष्टि. त्याचप्रमाणें येथेंहि निकृष्ट ओंकाराचे ठिकाणीं उत्कृष्ट ब्रह्माची दृष्टि ठेवून उपासना करावी. पण ओंकाराला प्रतीक कां म्हणतां ? तो साक्षात् ब्रह्माचा वाचक आहे, असें कां म्हणत नाहीं ? म्हणून विचाराल तर सांगतों–)=पर ब्रह्माचा शब्दादिकांनीं साक्षात् बोध करितां येत नाहीं. कारण तें सर्वविशेषधर्मांनीं रहित आहे व तें अतींद्रियगोचर असल्यामुळें–इंद्रियविषय होणारें नसल्यामुळें केवल मनानें त्याच्यामध्यें प्रवेश करितां येणें शक्य नाहीं. पण भक्तीनें ज्याच्यामध्यें ब्रह्मभाव आरोपित केला आहे, अशा विष्णु, शिव इत्यादिकांच्या प्रतिमास्थानीय ओंकारामध्यें त्याचें ध्यान करणाऱ्या उपासकांचें चित्त त्याच्याच उपासनेनें निर्मल झालें असतां तें निर्विशेष ब्रह्म त्यांत स्वतःच प्रकाशित होतें, असें शास्त्रप्रामाण्यावरून अवगत होतें–कळतें. ( कारण तें जर उपासकांच्या चित्तांत प्रकाशित झालें नसतें, तर पर ब्रह्मप्राप्तीची इच्छा करणाऱ्या साधकांना त्याच्या उपासनेचें विधान व्यर्थ झालें असतें. पण स्वतःप्रमाण शास्त्राचें विधान व्यर्थ होणें इष्ट नाहीं. )=त्याचप्रमाणें अपर ब्रह्माच्या उपासनेनें निर्मल झालेल्या चित्तांत

अपर ब्रह्म स्वयंप्रकाशित होतें. तस्मात्–'ओं' हें ब्रह्माचें प्रतीक असल्यामुळें ओंकारच पर व अपर ब्रह्म आहे, असा उपचार ( गौण प्रयोग ) केला जातो. 'तस्माद्विद्वान्०' –तस्मात् असें जाणणारा पुरुष याच आयतनानें–आलंबनानें–आश्रयानें–आत्मप्राप्तीच्या साधनानें म्हणजेच ओंकाराच्या अभिध्यानानें, ध्यानाच्या अनुसार पर किंवा अपर यांतील कोणत्या तरी एका ब्रह्मास प्राप्त होतो. ( इतर उपासनांप्रमाणेंच ही उपासनाहि पर ब्रह्माला पोंचवूं शकणार नाहीं, असें कोणी म्हणेल म्हणून सांगतात–) =कारण ओंकार हें ब्रह्माचें–मन इत्यादि दुसऱ्या आलंबनांच्या अपेक्षेनें–समीपवर्ती ( अंतरंग व श्रेष्ठ) आलंबन आहे. २.

**श्रुतिः—स यद्येकमात्रमभिध्यायीत स तेनैव संवेदितस्तूर्णमेव जगत्यामभिसंपद्यते । तमृचो मनुष्यलोकमुपनयन्ते स तत्र तपसा ब्रह्मचर्येण श्रद्धया संपन्नो महिमानमनुभवति ॥ ३ ॥**

**अर्थ**—तो जर एकमात्राविशिष्ट ओंकाराचें ध्यान करील तर तो त्या एकमात्राविशिष्ट ओंकाराच्या ध्यानानेंच संबोधित होत्साता सत्वरच पृथ्वीमध्यें मनुष्यशरीरास प्राप्त होतो. त्या साधकाला ऋग्वेदरूप ऋचा मनुष्यशरीरास पोंचवितात, नंतर तो त्या मनुष्यजन्मांत तप, ब्रह्मचर्य, श्रद्धा यांनीं संपन्न होऊन विभूतीचा अनुभव घेतो. ३.

**भाष्यं—स यद्यप्योंकारस्य सकलमात्राविभागज्ञो न भवति तथाऽप्योंकाराभिध्यानप्रभावाद्विशिष्टामेव गतिं गच्छति एतदेकदेशज्ञानवैगुण्यतयोंकारशरणः कर्मज्ञानोभयभ्रष्टो न दुर्गतिं गच्छति किं तर्हि यद्यप्येवमोंकारमेवैकमात्राविभागज्ञ एव केवलोऽभिध्यायीतैकमात्रं सदा ध्यायीत स तेनैवैकमात्राविशिष्टोंकाराभिध्यानेनैव संवेदितः संबोधितस्तूर्णं क्षिप्रमेव जगत्यां पृथिव्यामभिसंपद्यते ॥**

**भाष्यार्थ**—'स यद्येकमात्र०'–तो ओंकाराचें अभिध्यान करणारा उपासक त्याच्या सकल मात्रांच्या विभागास जाणणारा जरी नसला तरी ओंकाराभिध्यानाच्या प्रभावानें विशिष्ट गतीलाच प्राप्त होतो. ओंकाराचा ज्यानें आश्रय केला आहे असा तो ओंकाराच्या एकदेशाचेंच ज्ञान असणें, या वैगुण्यामुळें कर्म व ज्ञान या दोन्ही साधनांच्या फलांपासून भ्रष्ट होत्साता दुर्गतीस जात नाहीं. तर काय ? केवल ओंकाराची एकच 'अ' ही मात्रा जाणणारा तो जरी एकमात्रात्मक ओंकाराचें सदा ध्यान करीत असला तरी 'स तेनैव०'–त्या एकमात्राविशिष्ट ओंकाराच्या ध्यानानेंच संबोधित –तन्मात्रासाक्षात्कारवान् झालेला तो सत्वरच पृथिवीमध्यें अभिसंपन्न होतो.

**भाष्यं—किं । मनुष्यलोकम् । अनेकानि हि जन्मानि जगत्यां संभवन्ति तत्र तं साधकं जगत्यां मनुष्यलोकमेवर्च उपनयन्त उपनिगमयन्ति । ऋच ऋग्वेद-**

**रूपा ह्योंकारस्य प्रथमैकमात्राऽभिध्याता। तेन स तत्र मनुष्यजन्मनि द्विजाग्र्यः संस्तपसा ब्रह्मचर्येण श्रद्धया च संपन्नो महिमानं विभूतिमनुभवति न वीतश्रद्धो यथेष्टचेष्टो भवति योगभ्रष्टः कदाचिदपि न दुर्गतिं गच्छति ॥ ३ ॥**

**भाष्यार्थ**—कशाला ? मनुष्यशरीरास (प्राप्त होतो असा भावार्थ.)='तमृचो०' –या पृथ्वीमध्येंहि पशु-पक्ष्यादि अनेक शरीरें संभवतात. त्यांतील पृथ्वीगत मनुष्यशरीरासच ऋचा त्या साधकाला पोंचवितात. कारण त्यानें ओंकाराच्या ऋग्वेदरूप पहिल्या मात्रेचेंच ('अ' या एका मात्रेचेंच) ध्यान केलेलें असतें. 'स तत्र तपसा०'–त्या ध्यानाच्या योगानें तो ध्याता त्या मनुष्यजन्मांत तप, ब्रह्मचर्य व श्रद्धा यांनीं संपन्न असा ब्राह्मणश्रेष्ठ होऊन विभूतीचा अनुभव घेतो. तो श्रद्धारहित होऊन मन मानेल तशी चेष्टा [यथेष्ट आचरण] करणारा होत नाहीं. म्ह० योगभ्रष्ट केव्हांहि दुर्गतीस जात नाहीं. ३.

**श्रुतिः**—**अथ यदि द्विमात्रेण मनसि संपद्यते सोऽन्तरिक्षं यजुर्भिरुन्नीयते सोमलोकम्। स सोमलोके विभूतिमनुभूय पुनरावर्तते ॥ ४ ॥**

**अर्थ**—पण तो जर विशिष्ट ओंकारानें मनामध्यें अभिसंपन्न झाला–एकाग्रतेनें 'मनच मी' असें समजला तर तो मेल्यावर यजुर्मन्त्रांकडून अन्तरिक्ष ज्याचा आधार आहे, अशा सोमलोकास नेला जातो. तो त्या सोमलोकांत विभूतीचा अनुभव घेऊन मनुष्यलोकीं पुनः परत येतो. ४.

**भाष्यं**—**अथ पुनर्यदि द्विमात्राविभागज्ञो द्विमात्रेण विशिष्टमोंकारमभिध्यायीत स्वप्नात्मके मनसि मननीये यजुर्मये सोमदैवत्ये संपद्यत एकाग्रतयाऽऽत्मभावं गच्छति। स एवं संपन्नो मृतोऽन्तरिक्षमन्तरिक्षाधारं द्वितीयमात्रारूपं द्वितीयमात्रारूपैरेव यजुर्भिरुन्नीयते सोमलोकं सौम्यं जन्म प्रापयन्ति तं यजूंषीत्यर्थः। स तत्र विभूतिमनुभूय सोमलोके मनुष्यलोकं प्रति पुनरावर्तते ॥ ४ ॥**

**भाष्यार्थ**—'अथ यदि०'–पण जर द्विमात्राविभागज्ञ उपासक द्वितीयमात्रारूपानें विशिष्ट असलेल्या ओंकाराचें म्हणजे ओंकारांतील उकार या दुसऱ्या मात्रेचें अभिध्यान करील; तर स्वप्नात्मक, सोम ही ज्याची देवता आहे अशा यजुर्मय मननीय मनामध्यें संपन्न होतो; एकाग्रतेनें मनच मी आहें, अशा आत्मभावास प्राप्त होतो. 'स सोमलोके०'–अशाप्रकारें संपन्न झालेला उपासक मेल्यावर अंतरिक्ष हा ज्याचा आधार आहे अशा द्वितीयमात्रारूप सोमलोकास द्वितीयमात्रारूप यजुःसंज्ञक मंत्रांकडूनच नेला जातो. यजुर्मंत्र त्याला सोमलोकांतील जन्मास पोंचवितात, असा इत्यर्थ.

नंतर तो उपासक तेथें विभूतीन्त्रा ( तेथील ऐश्वर्याचा ) अनुभव घेऊन मनुष्यलोकास पुन: परत येतो. ४.

**श्रुति:—य: पुनरेतं त्रिमात्रेणोमित्येतेनैवाक्षरेण परं पुरुषमभिध्यायीत स तेजसि सूर्ये संपन्नः । यथा पादोदरस्त्वचा विनिर्मुच्यत एवं ह वै स पाप्मना विनिर्मुक्तः स सामभिरुन्नीयते ब्रह्मलोकं स एतस्माज्जीवघनात्परात्परं पुरिशयं पुरुषमीक्षते तदेतौ श्लोकौ भवत: ॥५॥**

**अर्थ**—पण जो या ओंकाराचें–त्रिमात्र ' ओं ' याच अक्षरानें पर पुरुषाचें प्रतीक या रूपानें ध्यान करितो तो तेजांत–सूर्यांत संपन्न होतो. ( तो सोमलोकांतून जसा तसा सूर्यलोकाहून परत येत नाहीं.) सर्प जसा कातीनें विरहित होतो त्याप्रमाणें पापानें विशेषेंकरून मुक्त झालेला तो सामांकडून ब्रह्मलोकाला नेला जातो. तो या जीवघन हिरण्यगर्भाहून परात्पर परमात्माख्य पुरिशय पुरुषास पाहतो. या अर्थी हे दोन श्लोक आहेत.५.

**भाष्यं—य: पुनरेतमोंकारं त्रिमात्रेण त्रिमात्राविषयविज्ञानविशिष्टेनोमित्येतेनैवाक्षरेण परं सूर्यान्तर्गतं पुरुषं प्रतीकेनाभिध्यायीत तेनाभिध्यानेन । प्रतीकत्वेन ह्यालम्बनत्वं प्रकृतमोंकारस्य परं चापरं च ब्रह्मेत्यभेदश्रुतेरोंकारमिति च द्वितीयाऽनेकश: श्रुता बाध्येतान्यथा यद्यपि तृतीयाभिध्यानत्वेन करणत्वमुपपद्यते तथाऽपि प्रकृतानुरोधात्त्रिमात्रं परं पुरुषमिति द्वितीयैव परिणेया त्यजेदेकं कुलस्यार्थ इति न्यायेन ॥**

**भाष्यार्थ**—( याप्रमाणें वरील दोन ब्राह्मणांत ओंकाराची स्तुति करून आतां त्याच्या परब्रह्मविषयक उपासनेचें विधान करितात–)=' य: पुनरेतम्० '–पण जो उपासक या ओंकाराचें त्रिमात्राविषयविज्ञानविशिष्ट ओंकार, या अक्षरानेंच ( म्हणजे पूर्वीप्रमाणें एकेका मात्रेनें नव्हे. तर )='ओं' या अक्षरप्रतीकानेंच सूर्यान्तर्गत पर पुरुषाचें अभिध्यान करितो, तो या अभिध्यानानें तृतीय ओंकारमात्रारूप होऊन तेजांत म्हणजे सूर्यांत संपन्न होतो. वर ओंकाराला पर व अपर ब्रह्मात्मक म्हटलें आहे. यास्तव त्याचें प्रतीकत्वानें आलंबनत्वच प्रकृत आहे; नाहीं तर ' ओंकारं अभिध्यायीत ' ' स यद्येकमात्रमभिध्यायीत ' अशी दोनदा श्रुत असलेली द्वितीया बाधित होईल. म्हणून ओंकाराच्या आश्रयानें परपुरुषाचें ध्यान येथें घेतलें पाहिजे. शिवाय 'ओंकारानें ' अशी तृतीया विभक्ति येथें योजिलेली असल्यामुळें ओंकार हें अभिध्यानाचें करण–साधन आहे, असें म्हणणें जरी युक्त असलें तरी प्रकृत विषयाच्या अनुरोधानें ' त्रिमात्र पर पुरुषास ' असा त्याचा द्वितीयान्तच अर्थ करावा. ( म्हणजे ' ओंकारानें ' या तृतीयेची ' ओंकारास ' अशी द्वितीया करून घ्यावी. )=' त्यजेदेकं कुलस्यार्थे ' म्हणजे

कुलाकरितां–समूहाच्या संरक्षणाकरितां प्रसंगीं एकाचा त्याग करावा, हा न्याय प्रसिद्धच आहे. त्या न्यायानें द्वितीयाच करावी.

**भाष्यं—स तृतीयमात्रारूपस्तेजसि सूर्ये संपन्नो भवति ध्यायमानो मृतोऽपि सूर्यात्सोमलोकादिव न पुनरावर्तते किं तु सूर्ये संपन्नमात्र एव। यथा पादोदरः सर्पस्त्वचा विनिर्मुच्यते जीर्णत्वग्विनिर्मुक्तः स पुनर्नवो भवति। एवं ह वा एष यथा दृष्टान्तः स पाप्मना सर्पत्वक्स्थानीयेनाशुद्धिरूपेण विनिर्मुक्तः सामभिस्तृतीयमात्रारूपैरूर्ध्वमुन्नीयते ब्रह्मलोकं हिरण्यगर्भस्य ब्रह्मणो लोकं सत्याख्यम्। स हिरण्यगर्भः सर्वेषां संसारिणां जीवनामात्मभूतः। स ह्यन्तरात्मा लिङ्गरूपेण सर्वभूतानां तस्मिन्हि लिङ्गात्मनि संहताः सर्वे जीवाः। तस्मात्स जीवघनः। स विद्वांस्त्रिमात्रोंकाराभिज्ञ एतस्माज्जीवघनाद्धिरण्यगर्भात्परात्परं परमात्माख्यं पुरुषमीक्षते पुरिशयं सर्वशरीरानुप्रविष्टं पश्यति ध्यानमानः। तदेतस्मिन्यथोक्तार्थप्रकाशकौ मन्त्रौ भवतः ॥ ५ ॥**

**भाष्यार्थ—**' स तेजसि '–तो तृतीयमात्रारूप तेजांत–सूर्यांत संपन्न होतो. तो ध्यान करणारा जरी मेला तरी सोमलोकांतून उपासक जसा परत मनुष्यलोकांत येतो, तसा सूर्यालोकाहून परत येत नाहीं. तर तो केवल सूर्यामध्यें तादात्म्य पावतो. जसा सर्प त्वचेकडून विनिर्मुक्त होतो व जीर्ण त्वचेपासून मुक्त झालेला–कात टाकलेला तो पुनः नवा होतो त्याप्रमाणेंच म्ह० जसा हा दृष्टान्त आहे त्याप्रमाणें सर्पाच्या कातेच्या स्थानीं असलेल्या अशुद्धिरूप पापानें अगदीं रहित झालेला ( पापानें ज्याला सोडिलें आहे असा ) तो त्रिमात्र-ओंकारोपासक तृतीयमात्रारूप साम-मंत्रांकडून ऊर्ध्व लोकीं–उच्च लोकीं–हिरण्यगर्भसंज्ञक ब्रह्माच्या सत्यसंज्ञक लोकीं–सत्यलोकीं नेला जातो. कारण तो हिरण्यगर्भ सर्व संसारी जीवांचा आत्मभूत आहे. ( सर्व जीवांचा आत्मा आहे ). तोच सर्व भूतांचा समष्टिलिंगरूपानें अंतरात्मा आहे. त्या समष्टिलिंगात्म्या हिरण्यगर्भामध्यें व्यष्टिलिंगाभिमानी सर्व जीव ( गोत्व या जातींत संहत–संबद्ध असलेल्या खंड-मुंडादि–काळी, पांढरी, शिंगें नसलेली इत्यादि अनेक गायींप्रमाणें ) संहत आहेत. यास्तव तो हिरण्यगर्भ जीवघन होय. असो; त्रिमात्र ओंकारास जाणणारा तो उपासक या जीवघन हिरण्यगर्भाहून परात्पर परमात्मसंज्ञक पुरुषास पाहतो, ध्यान करणारा तो सर्व शरीरांत प्रविष्ट झालेल्या परमात्म्यास पाहतो. हाच अर्थ व्यक्त करणारे याविषयीं हे दोन मंत्र आहेत. (ब्रह्मलोकांत स्थावरजंगमाहून पर असलेल्या जीवघनाहून पर–श्रेष्ठ पुरुषास पाहून उपासक मुक्त होतो.) ५.

श्रुतिः—तिस्रो मात्रा मृत्युमत्यः प्रयुक्ता अन्योन्यसक्ता अनविप्रयुक्ताः ।
क्रियासु बाह्याभ्यन्तरमध्यमासु सम्यक्प्रयुक्तासु न कम्पते ज्ञः॥६॥

अर्थ—ओंकाराच्या तीन मात्रा मृत्यूच्या विषयाचें अतिक्रमण न केलेल्या आहेत. ध्यानक्रियेमध्यें त्यांचा प्रयोग केलेला आहे. त्या इतरेतरसंबद्ध आहेत, त्या विशेषेंकरून एकेका विषयांतच प्रयुक्त नाहींत असें नाहीं; तर बाह्य, आभ्यंतर व मध्यम अशा योगक्रियांचा ध्यानकालीं चांगला प्रयोग केला असतां योगी कंपित होत नाहीं, चलन पावत नाहीं. ६.

भाष्यं—तिस्रस्त्रिसंख्याका अकारोकारमकाराख्या ओंकारस्य मात्राः । मृत्युमत्यः । मृत्युर्यासां विद्यते ता मृत्युमत्यो मृत्युगोचरादनतिक्रान्ता मृत्युगोचरा एवेत्यर्थः । ता आत्मनो ध्यानक्रियासु प्रयुक्ताः । किंचान्योन्यसक्ता इतरेतरसंबद्धाः । अनविप्रयुक्ता विशेषेणैकैकविषय एव प्रयुक्ता विप्रयुक्ताः । न तथा विप्रयुक्ता अविप्रयुक्ता नाविप्रयुक्ता अनविप्रयुक्ताः ॥

भाष्यार्थ—' तिस्रो मात्रा० '–ओंकाराच्या अकार, उकार व मकार अशा तीन मात्रा आहेत. पण त्या मृत्युमती–ज्यांना मृत्यु आहे, ज्यांनीं मृत्यूच्या विषयाचें अतिक्रमण केलेलें नाहीं, तर ज्या मृत्युगोचरच आहेत, असा इत्यर्थ. (कारण त्या मात्रांतील प्रत्येकीच्या ठिकाणीं ब्रह्मदृष्टि केल्यावांचून उपासकांना मृत्यूचें उल्लंघन करितां येत नाहीं–)=' प्रयुक्ताः '–त्यांचा आत्म्याच्या ध्यानक्रियेंत विनियोग केला आहे. शिवाय ' अन्योन्यसक्ताः'–त्या तिन्ही मात्रा अन्योन्यसंबद्ध आहेत. 'अनविप्रयुक्ताः '–विशेषेंकरून एकेका विषयांतच ज्यांचा प्रयोग केलेला असतो त्या विप्रयुक्त, तशा विप्रयुक्त ज्या नसतात त्या अविप्रयुक्त, ज्या अविप्रयुक्त नसतात त्या अनविप्रयुक्त.

भाष्यं—किं तर्हि विशेषेणैकस्मिन्ध्यानकाले तिसृषु क्रियासु बाह्याभ्यन्तरमध्यमासु जाग्रत्स्वप्नसुषुप्तस्थानपुरुषाभिध्यानलक्षणासु योगक्रियासु सम्यक्प्रयुक्तासु सम्यग्ध्यानकाले प्रयोजितासु न कम्पते न चलति ज्ञो योगी यथोक्तविभागज्ञ ओंकारस्येत्यर्थः । न तस्यैवंविदश्चलनमुपपद्यते । यस्माज्जाग्रत्स्वप्नसुषुप्तपुरुषाः सह स्थानैर्मात्रात्रयरूपेणोंकारात्मरूपेण दृष्टाः स ह्येवं विद्वान्सर्वात्मभूत ओंकारमयः कुतो वा चलेत्कस्मिन्वा ॥ ६ ॥

भाष्यार्थ—तर काय ? विशेषतः एकाच ध्यानकालीं तीन योगक्रियांमध्यें त्यांचा चांगल्या प्रकारें प्रयोग केला असतां ओंकाराचा हा पूर्वोक्त विभाग जाणणारा योगी मनांत चंचल होत नाहीं. जाग्रत्, स्वप्न व सुषुप्त स्थानांतील पुरुषाचें अभिध्यान करणें, ह्या बाह्य, मध्यम व आभ्यन्तर अशा तीन योगक्रिया आहेत. (जाग्रत्पुरुष

—वैश्वनराभिन्न विश्व आणि त्याचें स्थान स्थूलशरीर व जागरित, स्वाप्न पुरुष—हिरण्यगर्भाभिन्न तैजस, आणि त्याचें स्थान लिंगशरीर व स्वप्न आणि सुषुप्तपुरुष—ईश्वराभिन्न प्राज्ञ, त्याचें स्थान अव्याकृत व सुषुप्ति; त्यांचें मांडूक्योपनिषदांत सांगितल्याप्रमाणें अकार, उकार व मकार यांच्या तादात्म्यानें अभिध्यान करणें, या योगक्रियांमध्यें अन्योन्यसंबद्ध व ब्रह्मदृष्टीनें संश्लिष्ट अशा तीन मात्रांचा प्रयोग केला असतां उपासक मनांत कंपित होत नाहीं. अर्थात् या वाक्यानें सर्वात्मक परब्रह्मामध्यें ओंकारभेदानें ध्यान करावयास सांगितलें आहे. )=असो, असें जाणणाऱ्या त्या उपासकाचें चलनच उपपन्न होत नाहीं. कारण त्यानें स्थूलशरीरादि स्थानांसह जाग्रत्-स्वप्न-सुषुप्त पुरुषास ओंकारात्मरूपानें, मात्रात्रयरूपानें पाहिलेलें असतें. तेव्हां असें जाणणारा तो सर्वात्मभूत ओंकारमय पुरुष कोणत्या कारणानें चलन पावेल, विक्षिप्त होईल ? अथवा कोणत्या विषयाकरितां चंचल होईल ? ( तो स्वयं सर्वात्मा झाल्यामुळें स्वव्यतिरिक्त वस्तूचा अभावच होतो; आणि त्यामुळें त्याचें विक्षेपरूप चलन संभवत नाहीं. ) ६.

**श्रुतिः—ऋग्भिरेतं यजुर्भिरन्तरिक्षं सामभिर्यत्तत्कवयो वेदयन्ते । तमोंकारेणैवाऽऽयतनेनान्वेति विद्वान्यत्तच्छान्तमजरममृतमभयं परं चेति ॥७॥**

**इत्यथर्ववेदीयप्रश्नोपनिषदि पञ्चमः प्रश्नः ॥ ५ ॥**

**अर्थ**—ऋचांच्या योगानें या लोकास, यजूंच्या योगानें अन्तरिक्षास व सामांच्या योगानें तिसऱ्या ब्रह्मलोकास विद्वान् जाणतात. त्या त्रिविध लोकास ओंकार याच आयतनानें—आश्रयानें विद्वान् जातो. तें जें शान्त, अजर, अमृत, अभय व पर ब्रह्म त्यास तो ओंकार, या गमनसाधनानेंच जातो. ७.

**भाष्यं—सर्वार्थसंग्रहार्थो द्वितीयो मन्त्रः । ऋग्भिरेतं लोकं मनुष्योपलक्षितम् । यजुर्भिरन्तरिक्षं सोमाधिष्ठितम् । सामभिर्यत्तद्ब्रह्मलोकमिति तृतीयं कवयो मेधाविनो विद्यावन्त एव नाविद्वांसो वेदयन्ते ॥**

**भाष्यार्थ**—सर्व अर्थांचा संग्रह करण्याकरितां हा दुसरा मंत्र आहे. ‘ ऋग्भिरेतं० ’ —ऋङ्मन्त्रांच्या योगानें या मनुष्योपलक्षित लोकास, यजुर्मंत्रांनीं सोमाधिष्ठित अन्तरिक्ष लोकास व सामांच्या योगानें त्या ब्रह्मलोकास कवी—बुद्धिमान्, विद्यावान्च, अविद्वान् नव्हेत, जाणतात. ( ज्या मंत्रांतील अक्षरें पादबद्ध असतात, छन्दःशास्त्रोक्त पादांनीं —अमक्या छन्दाच्या अमुक पादांत इतकींच अक्षरें असावींत इत्यादि नियमास अनुसरून बांधलेलीं असतात ते ऋङ्मन्त्र, ज्यांतील अक्षरें छन्दोबद्ध नसतात ते यजुर्मंत्र व जे गीतिरूप असतात ते साममंत्र होत. )

**भाष्यं**—तं त्रिविधं लोकमोंकारेण साधनेनापरब्रह्मलक्षणमन्वेत्यनुगच्छति विद्वान् । तेनैवोंकारेण यत्तत्परं ब्रह्माक्षरं सत्यं पुरुषाख्यं शान्तं विमुक्तं जाग्रत्स्वप्नसुषुप्त्यादिविशेषसर्वप्रपञ्चविवर्जितमत एवाजरं जरावर्जितममृतं मृत्युवर्जितमत एव यस्माज्जराविक्रियारहितमतोऽभयम् । यस्मादेवाभयं तस्मात्परं निरतिशयम् । तदप्योंकारेणाऽऽयतनेन गमनसाधनेनान्वेतीत्यर्थः । इतिशब्दो वाक्यपरिसमाप्त्यर्थः ॥ ७ ॥

इति श्रीमत्परमहंसपरिव्राजकाचार्यश्रीमद्गोविन्दभगवत्पूज्यपादशिष्य-
श्रीमच्छंकरभगवतः कृतौ प्रश्नोपनिषद्भाष्ये पञ्चमः प्रश्नः ॥ ५ ॥

**भाष्यार्थ**—' तमोंकारेणैव० '—विद्वान् ओंकाररूप साधनानें अपर ब्रह्मलक्षण त्या त्रिविध लोकास प्राप्त होतो. ( पण येथें अपर ब्रह्मप्राप्तीकरितां ज्या ओंकाराचा प्रयोग केलेला आहे त्याचाच त्रिमात्ररूप अभेदानें प्रयोग केला असतां ब्रह्मलोकांत गेल्यावर उपासकाला पर ब्रह्माचीहि प्राप्ति होते. कारण निर्विशेष ब्रह्मसाक्षात्कार झाला असतां उक्त ओंकाराचें क्रममुक्ति हें फल मिळतें, असें आतां सांगतात. उपासनाबलानें प्रथम ब्रह्मलोकीं जाऊन कल्पाच्या अन्तीं तेथील हिरण्यगर्भाबरोबर ब्रह्माला जाऊन मिळणें ही क्रममुक्ति होय. )=ज्या ओंकाराच्या योगानें अपर ब्रह्मास जातो त्याच ओंकाराच्या योगानें तो पर ब्रह्मालाहि जातो. तें अक्षर पर ब्रह्म सत्य, पुरुषसंज्ञक, शान्त–विमुक्त–जाग्रत्स्वप्न-सुषुप्ति इत्यादि विशेषयुक्त सर्व प्रपंचरहित,त्यामुळेंच अजर(जरारहित, जरा म्हणजे वृद्धावस्था ), आणि म्हणूनच मृत्युरहित आहे. हें जरासंज्ञक विक्रियेनें रहित असल्यामुळेंच अभय व अभय असल्याकारणानेंच पर—निरतिशय —ज्याच्याहून अधिक दुसरें कांहीं नाहीं, असें आहे.तें अक्षरहि या ओंकाररूप आयतनानें—गमनसाधनानें प्राप्त होतें, असा याचा अर्थ. या मंत्राच्या शेवटचा ' इति-' शब्द वाक्यपरिसमाप्तीकरितां आहे. ७.

इति प्रश्नोपनिषद्भाष्यार्थाचा पांचवा प्रश्न समाप्त.

---

## अथ षष्ठः प्रश्नः ।

**श्रुतिः—अथ हैनं सुकेशा भारद्वाजः पप्रच्छ ॥**

**अर्थ**—त्यानंतर त्याला सुकेशा भारद्वाज विचारता झाला.

**भाष्यं—अथ हैनं सुकेशा भारद्वाजः पप्रच्छ । समस्तं जगत्कार्यकरणलक्षणं सह विज्ञानात्मना परस्मिन्नक्षरे सुषुप्तिकाले संप्रतिष्ठत इत्युक्तम् । सामर्थ्यात्प्रलयेऽपि तस्मिन्नेवाक्षरे संप्रतिष्ठते जगत्तत एवोत्पद्यत इति सिद्धं भवति । न ह्यकारणे कार्यस्य संप्रतिष्ठानमुपपद्यते ॥**

**भाष्यार्थ**—( मुंडकांतील 'गताः कलाः पंचदश०' या मंत्रांत कर्मासह सोळा कलांचा परमात्म्यामध्यें लय सांगितला व 'यथा नद्यः स्यन्दमानाः' या मंत्रांत दृष्टान्तपूर्वक परप्राप्ति सांगितली. येथें त्या दोन्ही मंत्रांचा विस्तृत अर्थ सांगण्याकरितां हा सहावा प्रश्न आरंभिलेला आहे. )=त्यानंतर पिप्पलाद आचार्याकडे आलेल्या सहा मुनींतील पहिला सुकेशा भारद्वाज असें विचारिता झाला—कार्यकरणलक्षण सर्व जगत् विज्ञानात्म्यासह—जीवासह सुषुप्तिकालीं पर अक्षरांत संप्रतिष्ठित होतें, असें वर सांगितलें. सामर्थ्यावरून प्रलयकालींहि जगत् त्याच अक्षरांत संप्रतिष्ठित होतें व उत्पत्तिसमयीं त्याच्यापासूनच उत्पन्न होतें, असें सिद्ध होतें. ( अक्षरब्रह्माचें कारणत्व सिद्ध व्हावें, म्हणून प्रलयकालींहि त्यांतच जगाचा लय सांगितला आहे. )=कारण जें कारण नसतें त्यांत कार्याचें संप्रतिष्ठान संभवत नाहीं.

**भाष्यं—उक्तं च–"आत्मन एष प्राणो जायते" इति । जगतश्च यन्मूलं तत्परिज्ञानात्परं श्रेय इति सर्वोपनिषदां निश्चितोऽर्थः । अनन्तरं चोक्तं "स सर्वज्ञः सर्वो भवति" इति । वक्तव्यं च क तर्हि तदक्षरं सत्यं पुरुषाख्यं विज्ञेयमिति । तदर्थोऽयं प्रश्न आरभ्यते । वृत्तान्वाख्यानं च विज्ञानस्य दुर्लभत्वख्यापनेन तल्लब्ध्यर्थं मुमुक्षूणां यत्नविशेषोपादानार्थम् ॥**

**भाष्यार्थ**—आत्म्यापासून हा प्राण उत्पन्न होतो, असें वर ( तिसऱ्या प्रश्नांत ) म्हटलेंच आहे. जगाचें जें मूळ त्याच्या परिज्ञानानें ( साक्षात्कारानें, तें मूळ अद्वितीय आहे, अशा प्रकारच्या आत्मज्ञानानें ) परम श्रेय–अमृतभाव, संसारमोक्ष–होतो, असा सर्व उपनिषदांचा निश्चित अर्थ आहे. येथेंहि पुढें 'स सर्वज्ञः सर्वो भवति' या वाक्यानें अद्वितीय आत्मज्ञानानेंच सर्वात्मभावरूप श्रेय होतें, असें सांगितलें आहे. तर मग तें विज्ञेय, पुरुषाख्य, सत्य, अक्षर कोठें आहे, तें सांगणें उचित आहे. त्याकरितां हा प्रश्न आरंभिलेला आहे. त्या मूळ तत्त्वाचें विज्ञान अतिशय दुर्लभ आहे, हें

स्पष्ट सांगून त्याच्या प्राप्तीकरितां मुमुक्षूंनीं विशेष यत्न करावा, म्हणून येथें मागें घडलेल्या एका वृत्तान्ताचा अनुवाद केला आहे.

**श्रुति:—भगवन्हिरण्यनाभः कौसल्यो राजपुत्रो मामुपेत्यैतं प्रश्नमपृच्छत । षोडशकलं भारद्वाज पुरुषं वेत्थ तमहं कुमारमब्रुवं नाहमिमं वेद यद्यहमिममवेदिषं कथं ते नावक्ष्यमिति समूलो वा एष परिशुष्यति योऽनृतमभिवदति तस्मान्नार्हाम्यनृतं वक्तुं स तूष्णीं रथमारुह्य प्रवव्राज । तं त्वा पृच्छामि क्वासौ पुरुष इति ॥ १ ॥**

**अर्थ**—भगवन्, हिरण्यनाभ या नांवाचा कोसल देशाचा राजपुत्र मजपाशीं येऊन हा प्रश्न विचारूं लागला—"हे भारद्वाजा, तूं षोडशकल (ज्याला सोळा कला आहेत अशा) पुरुषाला जाणतोस का?" त्या कुमाराला मीं म्हटलें—"मी त्याला जाणत नाहीं. जर मी त्याला जाणत असतों तर तुला कसें सांगितलें नसतें. जो अनृत भाषण करितो तो समूल सर्वत: शुष्क होतो. तस्मात् मी अनृत बोलण्यास समर्थ नाहीं." तेव्हां तो मुकाट्यानें रथांत बसून निघून गेला. मी तुम्हांला त्याच्याविषयीं विचारितों. तो पुरुष कोठें आहे? १.

**भाष्यं—हे भगवन्हिरण्यनाभो नामतः कोसलायां भवः कौसल्यो राजपुत्रो जातितः क्षत्रियो मामुपेत्योपगम्यैतमुच्यमानं प्रश्नमपृच्छत । षोडशकलं षोडशसंख्याकाः कला अवयवा इवाऽऽत्मन्यविद्याध्यारोपितरूपा यस्मिन्पुरुषे सोऽयं षोडशकलस्तं षोडशकलं हे भारद्वाज पुरुषं वेत्थ विजानासि । तमहं राजपुत्रं कुमारं पृष्टवन्तमब्रुवमुक्तवानस्मि नाहमिमं वेद यं त्वं पृच्छसीति । एवमुक्तवत्यपि मय्यज्ञानमसंभावयन्तं तमज्ञाने कारणमवादिषम् । यदि कथंचिदहमिमं त्वया पृष्टं पुरुषमवेदिषं विदितवानस्मि कथमत्यन्तशिष्यगुणवतेऽर्थिने ते तुभ्यं नावक्ष्यं नोक्तवानस्मि न ब्रूयामित्यर्थः ॥**

**भाष्यार्थ**—'भगवन्हिरण्यनाभः०'—हे भगवन्, हिरण्यनाभ या नांवाचा कोसल देशांतील जातीनें क्षत्रिय असलेला राजपुत्र मजपाशीं येऊन हा पुढील प्रश्न विचारिता झाला.—'षोडशकलं'—ज्या पुरुषामध्यें सोळा कला, जणुं काय आत्म्याचे ठिकाणीं अविद्येमुळें आरोपित केलेले षोडशसंख्याक अवयवच आहेत तो षोडशकल; त्या षोडशकल पुरुषाला, हे भारद्वाज, तूं जाणतोस काय? 'तमहमब्रुवम्०'—तेव्हां असें विचारणाऱ्या त्या कुमार राजपुत्राला मीं म्हटलें—"तूं ज्याविषयीं विचारीत आहेस त्या पुरुषाला मी जाणत नाहीं." पण मीं असें सांगितलें असतांहि, मजमध्यें अज्ञान संभवत नाहीं, असें समजणाऱ्या त्याला मीं आपल्या अज्ञानाचें कारण असें सांगितलें.

तूं विचारलेल्या या पुरुषाला जर मी जाणत असतों तर तुझ्या सारख्या अत्यंत शिष्य-गुणवान् अर्थी शिष्याला तें कसें सांगितलें नसतें ? मी जर त्याला जाणतों तर तुलाहि त्याचें स्वरूप सांगितलें असतें, असा भावार्थ.

**भाष्यं—भूयोऽप्यप्रत्ययमिवाऽऽलक्ष्य प्रत्याययितुमब्रुवम् । समूलः सह मूलेन वा एषोऽन्यथा सन्तमात्मानमन्यथा कुर्वन्ननृतमयथाभूतार्थमभिवदति यः स परिशुष्यति शोषमुपैतीहलोकपरलोकाभ्यां विच्छिद्यते विनश्यति । यत एवं जाने तस्मान्नार्हाम्यहमनृतं वक्तुं मूढवत् ॥**

**भाष्यार्थ**—पण याहि माझ्या सांगण्याचा त्याला विश्वास येत नाहीं, असें जाणून त्याचा निश्चय करविण्याकरितां मीं पुनः म्हटलें-' समूलो वा०'–"ज्ञानी असलेल्या आपल्याला अज्ञानी म्हणणारा, आपणावर अज्ञानाचा आरोप करणारा समूळ-मूळासह सुकून जातो. जो अनृत, अयथाभूतार्थ-असत्य भाषण करितो तो शोषास प्राप्त होतो-इहलोक व परलोक यांपासून विच्छिन्न होतो, विनाश पावतो आणि ज्याअर्थी मी हें असें जाणत आहें त्याअर्थी मी मूढाप्रमाणें अनृत भाषण करण्यास योग्य नाहीं."

**भाष्यं—स राजपुत्र एवं प्रत्यायितस्तूष्णीं व्रीडितो रथमारुह्य प्रवव्राज प्रगतवान्यथागतमेव । अतो न्यायत उपसन्नाय योग्याय जानता विद्या वक्तव्यैवानृतं च न वक्तव्यं सर्वास्वप्यवस्थास्वित्येतत्सिद्धं भवति । तं पुरुषं त्वा त्वां पृच्छामि मम हृदि विज्ञेयत्वेन शल्यमिव मे हृदि स्थितं क्वासौ वर्तते विज्ञेयः पुरुष इति ॥ १ ॥**

**भाष्यार्थ**—असें म्हणून मी त्या राजपुत्राच्या मनाचा निश्चय केला असतां, माझ्या बोलण्यावर त्याचा विश्वास उत्पन्न केला असतां, लज्जित होऊन ' स तूष्णीं रथमारुह्य०'–मुकाट्यानें रथारूढ झाला व आल्या मार्गानें निघून गेला. यावरून न्यायतः ( यथाविधि ) संनिध येऊन राहिलेल्या योग्य शिष्याला ज्ञात्या गुरूनें सर्व अवस्थांमध्यें विद्या सांगावीच व कोणत्याहि दशेंत अनृत भाषण करूं नये, हें सिद्ध होतें. असो; यास्तव हे भगवन्, मी त्या षोडशकल पुरुषाविषयीं तुम्हांला विचारितों. कारण तो पुरुष माझ्या हृदयांत विज्ञेय-( जाणण्यास योग्य या-) रूपानें शल्याप्रमाणें पीडा देत राहिला आहे. तो पुरुष स्वरूपतः शल्य जरी नसला तरी आपलें जिज्ञासित-जाणण्यास इच्छिलेलें-जोंवर ज्ञात होत नाहीं तोंवर तें हृदयांत शल्याप्रमाणें भासतें. यास्तव ' तो विज्ञेय पुरुष कोठें आहे ' असें मी विचारितों. १.

**श्रुतिः—तस्मै स होवाच । इहैवान्तःशरीरे सोम्य स पुरुषो यस्मिन्नेताः षोडश कलाः प्रभवन्तीति ॥ २ ॥**

**अर्थ**—पिप्पलाद त्या सुकेशाला म्हणाले—" हे प्रिय शिष्या, याच शरीरांतील हृदय-कमलाकाशांत तो पुरुष आहे, कीं ज्यामध्यें या सोळा कला उद्भवतात." २.

**भाष्यं—तस्मै स होवाच । इहैवान्तःशरीरे हृदयपुण्डरीकाकाशमध्ये हे सोम्य स पुरुषो न देशान्तरे विज्ञेयो यस्मिन्नेता उच्यमानाः षोडश कलाः प्राणाद्याः प्रभवन्त्युत्पद्यन्त इति षोडशकलाभिरुपाधिभूताभिः सकल इव निष्कलः पुरुषो लक्ष्यतेऽविद्ययेति तदुपाधिकलाध्यारोपापनयेन विद्यया स पुरुषः केवलो दर्शयितव्य इति कलानां तत्प्रभवत्वमुच्यते ॥**

**भाष्यार्थ**—' तस्मै स० '—तेव्हां त्या भारद्वाजाला पिप्पलाद म्हणाला—' इहैवान्तः-शरीरे० '—" हे सोम्य—प्रियदर्शन, तो पुरुष याच अंतःशरीरांत, हृदयकमलाकाशांत आहे, असें तूं जाण. तो दुसऱ्या कोठें देशांतरीं आहे, असें समजूं नको. ' यस्मिन्नेताः०'—ज्याच्यामध्यें या पुढें सांगितल्या जाणाऱ्या प्राणादि सोळा कला उत्पन्न होतात. वस्तुतः तो निष्कल ( कलारहित, निरवयव ) असलेलाहि पुरुष अविद्येमुळें या उपाधिभूत सोळा कलांनीं सकल ( कलावान्, सावयव ) असल्यासारखा भासतो; यास्तव विद्येच्या योगानें त्याच्या उपाधिभूत कलांच्या अध्यारोपाचा अपनय ( निरास, अपवाद) करून केवल तो शुद्ध पुरुष दाखवावा, या उद्देशानें कलांचा त्याच्यापासून उद्भव होतो, असें येथें सांगितलें जातें.

**भाष्यं—प्राणादीनामत्यन्तनिर्विशेषे ह्यद्वये शुद्धे तत्त्वे न शक्योऽध्यारोपमन्तरेण प्रतिपाद्यप्रतिपादनादिव्यवहारः कर्तुमिति कलानां प्रभवस्थित्यप्यया आरोप्यन्तेऽविद्याविषयाः । चैतन्याव्यतिरेकेणैव हि कला जायमानास्तिष्ठन्त्यः प्रलीयमानाश्च सर्वदा लक्ष्यन्ते । अत एव भ्रान्ताः केचिदग्निसंयोगाद्घृतमिव घटाद्याकारेण चैतन्यमेव प्रतिक्षणं जायते नश्यतीति ॥**

**भाष्यार्थ**—कारण अत्यंत निर्विशेष—विशेषरहित, अद्वय व शुद्ध तत्वाचे ठिकाणीं प्राणादिकांचा अध्यारोप केल्यावांचून प्रतिपाद्य-प्रतिपादनादिव्यवहार करितां येणं शक्य नाहीं. यास्तव कलांचे उत्पत्ति, स्थिति व लय, हे अविद्याविषय भाव त्याच्या ठिकाणीं आरोपिले जातात. [ ते तिन्ही भाव अविद्येच्या अधीन आहेत. ] =प्राणादि सर्व कला चैतन्यरूप अधिष्ठानाला न सोडतांच ( त्याच्या अव्यतिरेकानेंच ) सर्वदा उत्पन्न होतात, स्थित होतात व लय पावतात, असें आढळतें. ( त्यामुळेंच त्या रज्जुरूप अधिष्ठानाला न सोडतांच उत्पन्न होऊन, भासणाऱ्या व रज्जूंतच लय पावणाऱ्या सर्पाप्रमाणें मिथ्या आहेत. )=त्या कला चैतन्याला न सोडतांच, त्याच्या सहवर्तमानच भासत असल्यामुळें तर कित्येक भ्रान्त—विज्ञानवादी बौद्ध अग्नीच्या

संयोगानें पातळ होणाऱ्या घृताप्रमाणें प्रतिक्षणीं ' अहं ' या आकाराचें आलय विज्ञानच वासनावशात् घटादि विषयाकार होतें व नाश पावतें असें म्हणतात. ( कारण विषय चैतन्यव्यतिरेकानें— चैतन्यावांचून—त्याहून भिन्नरूपानें जर प्रतीत झाला असता तर त्यांना पूर्वोक्त भ्रम होणें, मुळींच युक्त नव्हतें. )

**भाष्यं—तन्निरोधे शून्यमिव सर्वमित्यपरे । घटादिविषयं चैतन्यं चेतयितुर्नित्यस्याऽऽत्मनोऽनित्यं जायते विनश्यतीत्यपरे । चैतन्यं भूतधर्म इति लौकायतिकाः । अनपायोपजनधर्मकचैतन्यमात्मैव नाम रूपाद्युपाधिधर्मैः प्रत्यवभासते । " सत्यं ज्ञानमनन्तं ब्रह्म । प्रज्ञानं ब्रह्म । विज्ञानमानन्दं ब्रह्म । " " विज्ञानघन एव । " इत्यादिश्रुतिभ्यः ॥**

**भाष्यार्थ**—चैतन्याव्यतिरेकानें विषयाची प्रतीति व्हावी, असाच नियम असल्यामुळें सुषुप्ति, मूर्च्छा इत्यादि अवस्थांमध्यें विषयविज्ञानरूपानें चैतन्याचा अभाव होतो, असें पाहून कित्येकांस शून्याचा भ्रम झाला व ते ( माध्यमिक शून्यवादी बौद्ध ) चैतन्याचा निरोध झाला असतां जणुंकाय ' सर्वं शून्यं शून्यं ' असें म्हणूं लागले. दुसरे कांहीं जगत्तत्त्वाचा विचार करणारे ( नैयायिक ) आत्मा नित्य चेतयिता ( प्रकाशक ) आहे, व त्याचेंच घटादिविषय अनित्य चैतन्य उत्पन्न होतें व नाश पावतें, असें म्हणतात. लौकायतिक—लोकांत प्रसिद्ध असलेल्या समजुतीलाच प्रमाण मानणारे चार्वाक देहाकारानें संघात पावलेल्या पृथिवी, आप् , तेज व वायु या भूतांचाच चैतन्य हा धर्म आहे, असें प्रतिपादन करीत सुटले. ( पण त्यांतील एकाचेंहि म्हणणें युक्तियुक्त नाहीं. कारण चैतन्य प्राणादि कलांच्या आरोपाचें अधिष्ठान आहे, हें सिद्ध होण्याकरितां त्याचें नित्यत्व व एकत्व अवश्य मानलें पाहिजे.यास्तव )=उत्पत्ति व विनाश या धर्मांनीं रहित असलेलें चैतन्य म्हणजे आत्माच नामरूपादि उपाधिधर्मांनीं म्हणजे नाना रूपानें व कार्यत्वानें भासतो. कारण ' सत्यं ज्ञानं अनन्तं ब्रह्म ' ' प्रज्ञानं ब्रह्म ' ' विज्ञानं आनन्दं ब्रह्म० ' ' विज्ञानघन एव ' इत्यादि ' आत्मा सत्यस्वरूप, ज्ञानस्वरूप, अनन्त, आनंद आहे,' असें सांगणाऱ्या श्रुति आहेत. ( यास्तव श्रुतिविरुद्ध असलेले ते पक्ष त्याज्य होत. )

**भाष्यं—स्वरूपव्यभिचारिषु पदार्थेषु चैतन्यस्याव्यभिचाराद्यथा यथा यो यः पदार्थो विज्ञायते तथा तथा ज्ञायमानत्वादेव तस्य तस्य चैतनस्याव्यभिचारित्वं वस्तुतत्त्वं भवति । किंचिन्न ज्ञायत इति चानुपपन्नम् । रूपं च दृश्यते न चास्ति चक्षुरिति यथा । व्यभिचरति तु ज्ञेयं ज्ञानं न व्यभिचरति कदाचि-**

**दपि ज्ञेयम् । ज्ञेयाभावेऽपि ज्ञेयान्तरे भावाज्ज्ञानस्य । न हि ज्ञानेऽसति ज्ञेयं नाम भवति कस्यचित् ॥**

**भाष्यार्थ**—( शिवाय ज्ञानकालीं विषय असावेच लागतात, असा कांहीं नियम नसतो. कारण विषयांवांचूनहि निर्विकल्प ज्ञान राहूं शकतें. पण विषयांचे वेळीं मात्र ज्ञानाचें अस्तित्व अवश्य असावें लागतें, असा नियम असल्यामुळें विषयांहून ज्ञान भिन्न आहे, असें सिद्ध होतें, असें सांगून भाष्यकार विज्ञानवादी बौद्धाच्या पक्षाचें निराकरण करितात व चैतन्याचा व्यभिचार कोठेंहि आणि केव्हांहि होत नसल्यामुळें ज्ञानाचें नित्यत्व सिद्ध करून नैयायिकादिकांच्या पक्षाचेंहि निराकरण करितात–)=सर्व पदार्थ स्वरूपतः व्यभिचार पावत असतांनाहि चैतन्याचा व्यभिचार होत नाहीं. ( घटाचें जेव्हां स्फुरण होतें तेव्हां पट स्फुरत नाहीं, पटाच्या स्फुरण-समयीं गृह, क्षेत्र, द्रव्य इत्यादि इतर पदार्थांचें स्फुरण नाहीं, तर प्रत्येक प्रतीतीच्या वेळीं केवल तिचा विषय मात्र भासतो, इतर पदार्थ व्यभिचार पावतात. पण प्रत्येक प्रतीतींत चैतन्य असतेंच, त्याचा इतर विषयांप्रमाणें व्यभिचार होत नाहीं. तसेंच घट, वस्त्र, गृह इत्यादिकांचें जेव्हां स्मरण–स्मृतिज्ञान होतें, तेव्हांहि घटादि विषयांचा अभाव असतो. पण जेव्हां जेव्हां विषयांचें ज्ञान आहे तेव्हां तेव्हां ज्ञानाचा व्यभिचार झाला आहे, ज्ञानाचा अभाव आहे, असें केव्हांहि घडत नाहीं. )=यास्तव जो जो पदार्थ जसा जसा जाणला जातो तसा तसा तो जाणला जात असल्यामुळेंच त्याच्या त्याच्या चैतन्याचें त्याला सोडून न राहणें–चैतन्याचें अव्यभिचारित्व, हें वस्तुतत्त्व आहे, असें सिद्ध होतें. एखादी गुप्त किंवा नष्ट झालेली वस्तु जाणली जात नाहीं, हें म्हणणें 'रूप दिसतें, पण नेत्र नाहीं;' या म्हणण्याप्रमाणें अयुक्त आहे. ( कारण रूप दिसलें असतां नेत्राची सिद्धि जशी आपोआप होते त्याप्रमाणें उत्पन्न होऊन नाश पावलेल्या किंवा मेरूच्या गुहेंत असलेल्या कांहीं वस्तु ज्ञात होत नाहींत, या म्हणण्यावरूनहि ज्ञानाची सिद्धि आपोआप होते. कारण ज्ञानावांचून अमुक ज्ञात झालें नाहीं, किंवा होत नाहीं, असें तरी कसें म्हणतां येईल ! )=ज्ञानसमयीं ज्ञेयानें असलेंच पाहिजे असा कांहीं नियम नसल्यामुळें ज्ञेय ज्ञानास सोडून राहूं शकतें, हें अगदीं स्पष्ट आहे. ( कारण घटस्मरणाचे वेळीं घटाचा अभाव असतो. पण 'याच न्यायानें पटज्ञानाच्या वेळीं घटज्ञानाचाहि अभाव असतो' असें म्हणून कोणी ज्ञानाचा व्यभिचार दाखवूं लागेल तर तें बरोबर नाहीं. कारण घटविशिष्ट ज्ञानाचा पटज्ञानाचे वेळीं व्यभिचार जरी होत असला तरी ज्ञानाचा स्वरूपतः व्यभिचार होत नाहीं; पण विषयांचा स्वरूपतः व्यभि-चार होतो, हा भेद ध्यानांत ठेविला पाहिजे. )=परंतु ज्ञेयाप्रमाणें ज्ञान ज्ञेयाला सोडून

कधींहि रहात नाहीं. कारण एका ज्ञेयाचा अभाव जरी असला तरी त्याच वेळीं दुसरें ज्ञेय स्फुरत असल्यामुळें ज्ञानाची स्वरूपतः सिद्धि होते. ज्ञानाच्या अभावीं कोणालाहि ज्ञेयाचें स्फुरणच होणें अशक्य आहे.

**भाष्यं—सुषुप्तेऽदर्शनाज्ज्ञानस्यापि सुषुप्तेऽभावाज्ज्ञेयवज्ज्ञानस्वरूपस्य व्यभिचार इति चेन्न । ज्ञेयावभासकस्य ज्ञानस्याऽऽलोकवज्ज्ञेयाभिव्यञ्जकत्वात्स्वव्यङ्ग्याभाव आलोकाभावानुपपत्तिवत्सुषुप्ते विज्ञानाभावानुपपत्तेः । न ह्यन्धकारे चक्षुषा रूपानुपलब्धौ चक्षुषोऽभावः शक्यः कल्पयितुं वैनाशिकेन ॥**

**भाष्यार्थ**—'पण निद्रासमयीं ज्ञानाचाहि लोप होतो. यास्तव ज्ञेयाप्रमाणें सुषुप्तींत ज्ञानाचाहि स्वरूपतः व्यभिचार होतो' म्हणून कोणी म्हणेल तर तें बरोबर नाहीं. कारण ज्ञेय विषयाला प्रकाशित करणारें ज्ञान प्रकाशाप्रमाणें ज्ञेयाला अभिव्यक्त करणारें आहे ( म्हणजे प्रकाश अंधकारांत असलेल्या घट-वस्त्रादि पदार्थांना जसा व्यक्त करितो त्याप्रमाणें ज्ञानहि ज्ञेयाला व्यक्त करितें. )=त्यामुळें प्रकाशाचा व्यंग्य-व्यक्त करण्यास योग्य विषय नसल्यास प्रकाशाचाहि अभाव आहे, असें समजणें जसें अयुक्त त्याचप्रमाणें सुषुप्तांत व्यंग्य विषय नाहींत, म्हणून ज्ञानहि नाहीं, असें म्हणणें अगदीं अयुक्त आहे. ( परंतु ज्ञान अनुमेय आहे. म्हणजे त्याचें नेहमीं व्यंग्य विषयाच्या प्रतीतीवरूनच अनुमान करावें लागतें; यास्तव व्यंग्याचा अभाव असल्यास त्याचाहि अभाव आहे असें आम्ही म्हणतों. प्रकाश प्रत्यक्षप्रमाणानेंच सिद्ध आहे. तो ज्ञानाप्रमाणें केवल व्यंग्य ज्ञानानेंच कल्पना करितां येण्यासारखा नाहीं. यास्तव त्याचा दृष्टान्त बरोबर नाहीं, असें 'ज्ञान अनुमेय आहे' असें म्हणणारा वादी—वैनाशिक बौद्ध—म्हणेल म्हणून त्याच्याकरितां भाष्यकार दुसरा दृष्टान्त देतात—)=अंधकारांत नेत्रानें रूपाची उपलब्धि होत नाहीं. पण त्यामुळें नेत्राचाच अभाव आहे, अशी कल्पना वैनाशिकानें करणें शक्य नाहीं.

**भाष्यं—वैनाशिको ज्ञेयाभावे ज्ञानाभावं कल्पयत्येवेति चेद्येन तदभावं कल्पयेत्तस्याभावः केन कल्प्यत इति वक्तव्यं वैनाशिकेन । तदभावस्यापि ज्ञेयत्वाज्ज्ञानाभावे तदनुपपत्तेः ॥**

**भाष्यार्थ**—पण वैनाशिक ज्ञेयाच्या अभावीं ज्ञानाचा अभाव असतो, अशी कल्पना करितोच. कारण त्याच्या मतीं विज्ञानव्यतिरिक्त प्रकाशादिकांचा अभाव मानिलेला आहे, असें म्हणशील तर त्यावर आम्ही असें विचारितों कीं, ज्ञानाच्या अभावाची कल्पना करविणाऱ्या ज्ञेयाभावाचें ज्ञान तूं—वैनाशिक मानतोस कीं नाहीं? जर मानीत असशील तर ज्ञानाच्या अभावाची सिद्धि होणार नाहीं. कारण त्यावेळींहि तेंच ज्ञेयाभावज्ञान विद्यमान असतें. तेव्हां तूं ज्या ज्ञेयाभावज्ञानानें ज्ञानाभावाची कल्पना करणार

त्या ज्ञानाच्या अभावाची कल्पना दुसऱ्या कोणत्या उपायानें करणार? तें तुज वैनाशिकाला सांगणें भाग आहे. आतां या अडचणींतून मोकळें होण्याकरितां ज्ञेयाभावाचें ज्ञानच मानीत नसतील तर तेंहि अगदींच अयुक्त आहे. कारण ज्ञेयाचा अभावहि ज्ञेय आहे.( तोहि ज्ञानाचा विषय आहे.घटाचा अभाव आहे, हेंहि त्या अभावाच्या ज्ञानानेंच कळतें.)=तेव्हां त्याचें ज्ञान न मानल्यास स्वतःत्याचीच–ज्ञेयाभावाचीच असिद्धि होणार.

**भाष्यं—ज्ञानस्य ज्ञेयाव्यतिरिक्तत्वाज्ज्ञेयाभावे ज्ञानाभाव इति चेन्न। अभावस्यापि ज्ञेयत्वाभ्युपगमादभावोऽपि ज्ञेयोऽभ्युपगम्यते वैनाशिकैर्नित्यश्च तदव्यतिरिक्तं चेज्ज्ञानं नित्यं कल्पितं स्यात्तदभावस्य च ज्ञानात्मकत्वादभावत्वं वाङ्मात्रमेव न परमार्थतोऽभावत्वमनित्यत्वं च ज्ञानस्य। न च नित्यस्य ज्ञानस्याभावनाममात्राध्यारोपे किंचिन्नश्छिन्नम्॥**

**भाष्यार्थ**—( मध्यस्थ )–अहोपण, कोणतेंहि ज्ञान ज्ञेयाहून व्यतिरिक्त नसल्यामुळें ज्ञेयाच्या अभावीं ज्ञानाचा अभाव असतो. (सिद्धान्ती)–हें म्हणणें वैनाशिकांच्या अभ्युपगमाच्या विरुद्ध आहे. कारण त्याच्या मतींहि अभावाला ज्ञेयत्व–ज्ञानविषयत्व आहे. ('बुद्धिबोध्यं त्रयादन्यत्संस्कृतं क्षणिकं च तत्' असा त्यांचा अभ्युपगम आहे, अभ्युपगम म्हणजे सिद्धान्त–मत.या वाक्याचा अर्थ असा–प्रतिसंख्यानिरोध,अप्रतिसंख्यानिरोध व आकाश या तिहींस सोडून इतर सर्व उत्पन्न करण्यास योग्य व क्षणिक आहे. प्रतिसंख्या निरोध म्हणजे बुद्धिपूर्वक विनाश; घटाला दगड मारून मुद्दाम फोडणें; व अप्रतिसंख्या निरोध म्हणजे अबुद्धिपूर्वक विनाश; घटानें आपोआप फुटणें. तेव्हां वरील तीन वस्तूंहून इतर सर्व अनित्य असल्यामुळें त्यांच्या मताप्रमाणेंच दोन्ही निरोध म्हणजे अभाव ज्ञेय–ज्ञानाचे विषय–झाले, आणि ते अभावाला नित्य मानितात; त्यामुळें ज्ञान त्याहून अभिन्न असेल तर तें सुषुप्तांत विद्यमान असतें व तें नित्य आहे, असें प्राप्त होतें आणि ज्ञेयाचा अभावहि ज्ञानात्मक असल्यामुळें ज्ञानाचें अभावत्व व अनित्यत्व वाङ्मात्र–शब्दमात्रच आहे.(नुस्तें बोलण्यापुरतेंच आहे.)ज्ञानाला परमार्थतः अभावत्व अथवा अनित्यत्व नाहीं. ( मध्यस्थ )–अभावाच्या वाङ्मात्र अभावत्वानें व ज्ञानाच्या वाङ्मात्र अनित्यत्वानेंच आमच्या सिद्धान्ताची सिद्धि होते. ( सिद्धान्ती)– असें जर असेल तर नित्य ज्ञानाला केवल अभाव व अनित्य हें नांव दिल्यानें, त्याचा नुस्ता आरोप केल्यानें आमची कांहीं हानि होत नाहीं.

**भाष्यं—अथाभावो ज्ञेयोऽपि सञ्ज्ञानव्यतिरिक्त इति चेन्न तर्हि ज्ञेयाभावे ज्ञानाभावः। ज्ञेयं ज्ञानव्यतिरिक्तं न तु ज्ञानं ज्ञेयव्यतिरिक्तमिति चेत्। न। शब्दमात्रत्वाद्विशेषानुपपत्तेः। ज्ञेयज्ञानयोरेकत्वं चेदभ्युपगम्यते ज्ञेयं ज्ञातव्य-**

**तिरिक्तं ज्ञानं ज्ञेयव्यतिरिक्तं नेति तु शब्दमात्रमेतद्वह्निरग्निव्यतिरिक्तोऽग्निर्न वह्निव्यतिरिक्त इति यद्वदभ्युपगम्यते । ज्ञेयव्यतिरेके तु ज्ञानस्य ज्ञेयाभावे ज्ञानाभावानुपपत्तिः सिद्धा ॥**

**भाष्यार्थ**--बरें, हा दोष घालविण्याकरितां–अभाव ज्ञेय जरी असला तरी ज्ञानाहून व्यतिरिक्त आहे, असेंच आम्ही मानितों; ( तो ज्ञानरूप आहे, ज्ञानाभिन्न आहे, असें आम्ही मुळीं मानीतच नाहीं. )=म्हणून म्हणाल तर–सुषुप्तांत ज्ञेयाचा अभाव असतो म्हणून ज्ञानाचाहि अभाव असतो, म्हणजे ज्ञेयाच्या अभावीं ज्ञानाचाहि अभाव, असें म्हणतां येणार नाहीं. [ कारण सुषुप्तांत घटादि ज्ञेयांचा अभाव असल्यामुळें त्यांच्या ज्ञानांचाहि जरी अभाव असला तरी त्यावेळींहि अभावज्ञानाच्या अभावाची सिद्धि होत नसल्यामुळें म्हणजे अभावज्ञानाच्या भावाची–अस्तित्वाची सिद्धि होत असल्यामुळें त्याला अभावरूप म्हणतां येत नाहीं–]=बरें 'ज्ञेय ज्ञानव्यतिरिक्त आहे, पण ज्ञान ज्ञेयव्यतिरिक्त नाहीं' असें म्हणाल तर त्यांतहि कांहीं विशेष आहे, असें वाटत नाहीं. कारण ज्ञेय–विषय ज्ञानाहून निराळा आहे व ज्ञान त्याहून निराळें नाहीं, हें म्हणणें नुसतें शब्दमात्र आहे. ज्ञेय व ज्ञान यांचें एकत्व मान्य केल्यावर 'वह्नि अग्नीहून व्यतिरिक्त आहे पण अग्नि वह्नीहून व्यतिरिक्त नाहीं' या म्हणण्याप्रमाणेंच तेंहि–ज्ञेय ज्ञानव्यतिरिक्त आहे व ज्ञान ज्ञेयव्यतिरिक्त नाहीं, हें म्हणणेंहि–केवल शब्दमात्र होतें. पण हा दोष घालविण्याकरितां 'ज्ञेयाहून ज्ञान व्यतिरिक्त आहे' म्हणून म्हणाल, तर ज्ञेयाच्या अभावीं ज्ञानाचा अभाव होणें, अगदींच अयुक्त आहे, असें होईल. [ अर्थात् सुषुप्तांत ज्ञानाच्या अभावाची सिद्धि होणार नाहीं. ]

**भाष्यं**—**ज्ञेयाभावेऽदर्शनादभावो ज्ञानस्येति चेन्न । सुषुप्ते ज्ञप्त्यभ्युपगमात् । वैनाशिकैरभ्युपगम्यते हि सुषुप्तेऽपि ज्ञानास्तित्वं । तत्रापि ज्ञेयत्वमभ्युपगम्यते ज्ञानस्य स्वेनैवेति चेन्न । भेदस्य सिद्धत्वात् । सिद्धं ह्यभावविज्ञेयविषयस्य ज्ञानस्याभावज्ञेयव्यतिरेकाज्ज्ञेयज्ञानयोरन्यत्वम् । न हि तत्सिद्धं मृतमिवोज्जीवयितुं पुनरन्यथा कर्तुं शक्यते वैनाशिकशतैरपि ॥**

**भाष्यार्थ**—( वैनाशिक )–सुषुप्तांत ज्ञेयाच्या अभावीं ज्ञानाच्या अस्तित्वाचा अनुभव येत नसल्यामुळें आम्ही त्यावेळीं त्याचा अभाव मानितों. [ उगीच अयुक्तिक कांहीं तरी बोलत नाहीं. ] ( सिद्धान्ती )=हें म्हणणें व्यर्थ आहे, कारण तुम्ही–स्वतः वैनाशिकच सुषुप्तांतहि ज्ञप्तीचा–ज्ञानाचा स्वीकार करितांच. 'अहं' या प्रतीतीचा आश्रय करून असणाऱ्या आलयविज्ञानाच्या अहं-अहं-अहं या संततीला तुम्हींच नित्य मानिलेलें आहे. तेव्हां सुषुप्तांत घटादि ज्ञेय नसल्यामुळें घटादिविशिष्ट ज्ञानाचा जरी अभाव

असला तरी सामान्य ज्ञानाचा, त्या ज्ञेयाभावाच्या ज्ञानाचा, अभाव असतो, असें तुम्हांलाहि म्हणतां येणें शक्य नाहीं. ( वैनाशिक )=आम्ही ज्ञेयाच्या अभावानें तन्निरूप्य ज्ञानाचें अदर्शन होतें, असें म्हणतों. पण सुषुप्तांत स्वत: ज्ञानालाच स्वज्ञेयत्व असल्यामुळें आमच्या मतीं त्या अवस्थेंत ज्ञानदर्शन युक्तच आहे. ( पण तुम्ही ज्ञानाचें स्वज्ञेयत्व मानीत नाहीं व सुषुप्तांत अन्य पदार्थांचा तर अभाव असतो; त्यामुळें ज्ञानाचा निरूपक नसतो. यास्तव तुमच्या मतींच ज्ञानाच्या अस्तित्वाचें उपपादन करितां येत नाहीं. आम्हांला तें करितां येतें ) ( सिद्धान्ती )=पण ज्ञानाचें स्वज्ञेयत्व [ म्हणजे ज्ञानच ज्ञानाचें ज्ञेय आहे, ही गोष्ट ] युक्तीनें सिद्ध होते आहे कोठें ? आम्ही तर वर-अभावस्थलीं ज्ञान व ज्ञेय यांचा प्रकाश व अंधकार यांप्रमाणें भेद सिद्ध केला आहे. त्याच दृष्टान्तानें सर्वत्र ज्ञान व ज्ञेय यांचा भेदच ठरतो. अभेद [ ऐक्य ] मुळींच सिद्ध होत नाहीं. अभावरूप विज्ञेयविषयक ज्ञान [ अभावाचें ज्ञान ] अभावरूप ज्ञेयाहून पृथक् असल्यामुळें ज्ञान व ज्ञेय यांचें अन्यत्व [ भेद ] वर सिद्ध झालेला आहे. तेव्हां आतां मृताला जिवंत करण्याप्रमाणें ती सिद्ध झालेली गोष्ट शेकडों वैनाशिकांनाहि बदलतां येणें शक्य नाहीं.

**भाष्यं**---ज्ञानस्य ज्ञेयत्वमेवेति तदप्यन्येन तदप्यन्येनेति त्वत्पक्षेऽतिप्रसङ्ग इति चेन्न । तद्विभागोपपत्तेः सर्वस्य । यदा हि सर्वं ज्ञेयं कस्यचित्तदा तद्व्यतिरिक्तं ज्ञानं ज्ञानमेवेति द्वितीयो विभाग एवाभ्युपगम्यतेऽवैनाशिकैर्न तृतीयस्तद्विषय इत्यनवस्थानुपपत्तिः ॥

**भाष्यार्थ**--( वैनाशिक )-अहोपण ज्ञानाला स्वव्यतिरिक्त-स्वभिन्न, आपल्याहून पृथक् ज्ञेयाची अपेक्षा असते, हा तुमचा पक्ष मानिल्यास अनवस्था दोष येतो. कारण एक विषयज्ञान दुसऱ्या ज्ञानाचा विषय, तें दुसरेंहि ज्ञान तिसऱ्या ज्ञानाचा, तिसरें चवथ्या ज्ञानाचा याप्रमाणें ज्ञान व ज्ञेय यांची परंपरा लागून तिचा शेवट कोठेंच होणार नाहीं. ( सिद्धान्ती )-ही तुमची भीति व्यर्थ आहे. ज्ञेय स्वभिन्न ज्ञानाचा विषय असतें, म्हणजे कोणताहि विषय, त्या विषयाहून पृथक् असलेल्या ज्ञानानेंच ग्रहण करितां येतो, असा आमचा अभ्युपगम आहे. आम्ही ज्ञानाला ज्ञेय कधींहि मानीत नाहीं. ज्ञान त्रिकालीं ज्ञानच असतें, तें ज्ञेय कधींहि होत नाहीं, व ज्ञेय त्रिकालीं ज्ञेयच राहतें, तें ज्ञान कधींहि होत नाहीं, अशा प्रकारचा सर्व वस्तूंचा विभाग अगदीं उपपन्न ( युक्त ) आहे. ( अथवा ) आम्ही अवैनाशिक एक ज्ञेयराशी व दुसरी ज्ञानराशी या दोनच राशी मानितों, ज्ञानविषयक ज्ञान, ही आणखी तिसरी राशी तुम्हां वैनाशिकांप्रमाणें मानीत नाहीं. त्यामुळें वरील अनवस्था दोष येत नाहीं.

**भाष्यं—ज्ञानस्य स्वेनैवाविज्ञेयत्वे सर्वज्ञत्वहानिरिति चेत्सोऽपि दोषस्तस्यैवास्तु किं तन्निबर्हणेनास्माकम्। अनवस्थादोषश्च ज्ञानस्य ज्ञेयत्वाभ्युपगमात्। अवश्यं च वैनाशिकानां ज्ञानं ज्ञेयम्। स्वात्मना चाविज्ञेयत्वेनानवस्थाऽनिवार्या ॥**

**भाष्यार्थ**—( वैनाशिक )–पण ज्ञान स्वत:चेंच विज्ञेय होत नाहीं, असें जर म्हणाल तर तुमच्या मतीं ज्ञानस्वरूप ब्रह्माला सर्वज्ञत्व असूं शकणार नाहीं. कारण तें स्वत:च स्वत:ला जाणूं शकणार नाहीं. ( अर्थात् त्याच्या सर्वज्ञत्वाची हानि होणार! ) ( सिद्धान्ती )–पण हा दोष आमच्या मतीं मुळींच येत नाहीं. कारण जाणण्यास योग्य असलेल्या सर्व वस्तूंना न जाणल्यास सर्वज्ञत्वाची हानि होते; सशाचें शिंग, वंध्येचा पुत्र, इत्यादि जाणण्यास योग्य नसलेल्या सहस्रावधि वस्तूंनाहि न जाणल्यास सर्वज्ञत्वाची हानि होत नाहीं. पण त्यांना न जाणल्यानेंहि ती होते, असें म्हटल्यास कोणाच्याहि मतीं सर्वज्ञत्वाची सिद्धि होणार नाहीं. अर्थात् आमच्या मतीं हा दोष नाहीं. परंतु तुम्हां वैनाशिकांवरच हा दोष येतो. कसा तो पहा–ज्ञान अवश्य ज्ञेय असलें पाहिजे, असा तुमचा सिद्धान्त आहे. पण ज्ञान स्वत:च स्वत:चें ज्ञेय आहे, या म्हणण्यावर आम्हीं वर दूषण दिलें आहे. ज्ञेय ज्ञानाहून पृथक् आहे, हेंहि तुम्हांला मान्य नाहीं. तेव्हां सर्व–ज्ञेयच जर नाहीं तर सर्वज्ञ कोठचा ? अर्थात् तुमच्याच मतीं सर्वज्ञाची असिद्धि आहे; आमच्या मतीं नाहीं. तर मग तुम्ही वेदान्ती तरी सर्वज्ञत्वाचा निर्वाह कसा करितां ? म्हणून विचाराल तर तेंहि सांगतों–आमच्या मतीं सर्वज्ञ मायिक आहे. त्यामुळें आम्हांला त्याचा निर्वाह जरी न करितां आला तरी त्यांत कांहीं दोष नाहीं. शिवाय वस्तुत: पाहिल्यास, व्यवहारोपयोगी सर्व ज्ञान असणें हें सर्वज्ञत्व होय. तें तर ज्ञानालाहि आहे. कारण तें स्वप्रकाश असल्यामुळें स्वव्यवहारहेतु होऊं शकतें. किंवा जाणण्यास योग्य असलेल्या सर्व वस्तूंच्या ज्ञानानेंहि सर्वज्ञत्वाची सिद्धि होते. अनवस्था दोषहि तुम्हां वैनाशिकांवरच येतो. आम्हांवर येत नाहीं. कारण तुम्ही ज्ञानाला ज्ञेय समजतां ! तेव्हां वैनाशिकांचें प्रत्येक ज्ञान ज्ञेय अवश्य असणारच ! अर्थात् ज्ञान-ज्ञेयांची परंपरा कोठेंहि कुंठित न होतां अनवस्था दोष येतोच–आणि ज्ञानानें स्वत:च स्वत:चें ज्ञेय होणें, कसें असंभवनीय आहे, हें वर सांगितलेलें असल्यामुळें दुसऱ्या ज्ञानाचें ज्ञेय होणाऱ्या ज्ञानांची अकुंठित परंपरा लागून अनवस्था अनिवार्य होते.

**भाष्यं—समान एवायं दोष इति चेन्न। ज्ञानस्यैकत्वोपपत्तेः। सर्वदेशकालपुरुषाद्यवस्थमेकमेव ज्ञानं नामरूपाद्यनेकोपाधिभेदात्सवित्रादिजलादिप्रतिबिम्बवदनेकधाऽवभासत इति। नासौ दोषः। तथा चेहेदमुच्यते ॥**

**भाष्यार्थ**--( वैनाशिक )-पण हा दोष आम्हांप्रमाणें तुम्हांवरहि येत असल्यामुळें समान आहे. कारण ज्ञान अज्ञेय आहे, असें म्हटल्यास त्याच्या व्यवहाराची असिद्धि होते व तें दुसऱ्या ज्ञानाचें ज्ञेय होतें, म्हणून म्हटल्यास अनवस्था होते. ( सिद्धान्ती )-आम्हांवर हा दोष मुळींच येत नाहीं. कारण ज्ञान स्वप्रकाश असल्यामुळें, स्वप्रकाश दीपाप्रमाणें, त्याच्या व्यवहाराची सिद्धि स्वतःच होते. त्यामुळें आम्ही ज्ञानाचा भेदच मानीत नाहीं. सर्व देश, सर्व काळ व सर्व पुरुष यांतील ज्ञान एकच आहे, असें समजतों. तेव्हां आम्हांवर अनवस्था दोष कोठून येणार ? ( पण तुम्ही ज्ञान एक आहे, या पक्षीं अनुभवास येणाऱ्या या भेदाची उपपत्ति कशी लावितां ? म्हणून विचाराल तर सांगतों–)=तें एकच ज्ञान नाम, रूप इत्यादि अनेक उपाधींमुळें, जलादि उपाधींमुळें सूर्यादिकांच्या अनेक प्रतिबिंबांप्रमाणें, अनेक प्रकारें भासतें. त्यामुळें वरील दोष येत नाहीं. ( असो; याप्रमाणें चैतन्य एक असल्यामुळें नित्य व जगाहून भिन्न असल्यामुळें सत्य आहे. कारण जे पदार्थ अनेक असतात ते परस्पर वस्तुतः परिच्छिन्न होऊन अनित्य ठरतात व अनेकात्मक जगत् असत्य असल्यामुळें तद्भिन्न चैतन्य सत्य ठरतें. तें नित्य व सत्य असल्यामुळेंच अधिष्ठान होऊं शकतें. )=या प्रश्नांत आत्म्याच्या ज्ञानाकरितां त्याच्या ठिकाणीं कलांचा अध्यारोप सांगितलेला आहे.

**भाष्यं—ननु श्रुतेरिहैवान्तःशरीरे परिच्छिन्नः कुण्डबदरवत्पुरुष इति । न । प्राणादिकलाकारणत्वात् । न हि शरीरमात्रपरिच्छिन्नस्य प्राणश्रद्धादीनां कलानां कारणत्वं प्रतिपत्तुं शक्नुयात् । कलाकार्यत्वाच्च शरीरस्य । न हि पुरुषकार्याणां कलानां कार्यं सच्छरीरं कारणकारणं स्वस्य पुरुषं कुण्डबदरमिवाभ्यन्तरी कुर्यात् ॥**

**भाष्यार्थ**-(पूर्वपक्षी)-अहोपण, 'येथेंच या अंतःशरीरांत तो षोडशकल पुरुष आहे' अशी श्रुति असल्यामुळें भांड्यांतील बोरांप्रमाणें तो देशतः, कालतः व वस्तुतः परिच्छिन्न–मर्यादित आहे; आणि परिच्छिन्न वस्तूला घटादिकांप्रमाणें अनित्यत्व असतें. तस्मात् या श्रुतिवचनावरून चैतन्य पुरुष अनित्य आहे, असें होतें. ( सिद्धान्ती )= नाहीं. श्रुतिवचन 'या अंतःशरीरांत तो पुरुष आहे' असें जरी सांगत असलें तरी त्यावरून चैतन्यात्मा अनित्य आहे, असें ठरत नाहीं. कारण तो प्राणादि कलांचें कारण आहे. ( तो प्राणादिकांचेंहि जर कारण आहे तर त्या प्राणादि कलांचें कार्य अशा शरीरानें मर्यादित कसा होईल ? अर्थात् तो शरीराच्या आंत स्थित आहे हें म्हणणें त्याच्या प्रत्यक्त्वास–अंतर्यामित्वास, शरीर, इंद्रिय, मन, बुद्धि यांच्याहि आंत असणें, या धर्मास उद्देशून आहे. त्याचा खरोखरच परिच्छेद होतो, हें सांगण्याच्या

इच्छेनें नाहीं. कारण परिच्छेदाच्या विवक्षेनेंच त्याला शरीरान्त:स्थ म्हटलें आहे, असें समजल्यास ' ज्याच्यामध्यें या सोळा कला उद्भवतात ' या पुढच्या वाक्याशीं विरोध येतो. )=कारण नुस्त्या शरीरानें परिच्छिन्न झालेल्या पुरुषानें प्राण-श्रद्धादिकलांचें कारण होणें शक्य दिसत नाहीं. शरीर कलांचें कार्य असल्यामुळेंहि [ म्हणजे त्याच्यामध्यें चैतन्याला परिच्छिन्न करण्याची योग्यता नसल्यामुळेंहि ] पुरुष परिच्छिन्न होतो, हें सांगण्याचा श्रुतीचा उद्देश नाहीं. कारण स्वत: शरीर जर पुरुषाचीं कार्यें, अशा कलांचें कार्य आहे तर तें आपल्याहि कारणाच्या कारणाला म्हणजेच पुरुषाला, भांड्यांतील बोरांप्रमाणें, आपल्यामध्यें साठवूं शकणार नाहीं. ( कारण, कोणतेंहि कारण कार्याच्या अपेक्षेनें अधिक देशांत राहणारें म्हणजे व्यापक असतें, असा अनुभवसिद्ध न्याय आहे. तेव्हां शरीर आपल्या व्यापक कारणाच्याहि व्यापक कारणाला परिच्छिन्न कसें करूं शकेल ? शरीर आपल्या उत्पत्तीच्या पूर्वी नसतें, त्याचा अभाव असतो. त्यामुळेंहि त्यावेळीं—आपल्या अभावसमयीं असणाऱ्या पुरुषाला तें परिच्छिन्न करूं शकत नाहीं.)

**भाष्यं— बीजवृक्षादिवत्स्यादिति चेत् । यथा बीजकार्यं वृक्षस्तत्कार्यं च फलं स्वकारणकारणं बीजमभ्यन्तरी करोत्याम्रादि तद्वत्पुरुषमभ्यन्तरी कुर्याच्छरीरं स्वकारणकारणमपीति चेन्न । अन्यत्वात्सावयवत्वाच्च । दृष्टान्ते कारणबीजाद्वृक्षफलसंवृत्तान्यन्यान्येव बीजानि दार्ष्टान्तिके तु स्वकारणकारणभूत: स एव पुरुष: शरीरेऽभ्यन्तरीकृत: श्रूयते । बीजवृक्षादीनां सावयवत्वाच्च स्यादाधाराधेयत्वं निरवयवश्च पुरुष: सावयवाश्च कला: शरीरं च । एतेनाऽऽकाशस्यापि शरीराधारत्वमनुपपन्नं किमुताऽऽकाशकारणस्य पुरुषस्य तस्मादसमानो दृष्टान्त: ॥**

**भाष्यार्थ**—( वादी )—पण बीजापासून झालेला आम्रादि वृक्ष ( म्हणजे बीजाचें कार्य, असा वृक्ष ) आपल्यावर येणाऱ्या फलांचें कारण आहे आणि तीं फलें म्हणजे त्या वृक्षाचीं बीजेंच होत. अर्थात् वृक्षाचें कार्य असें फल आपल्या कारणभूत वृक्षाचें कारण ( बीज ) आपल्यामध्यें सांठवूं शकतें, असें आपण व्यवहारांत पाहतों. त्याप्रमाणेंच कलांचें कार्य शरीरहि कलांच्या कारणास—पुरुषास आपल्यामध्यें सांठवूं शकेल, असें मानिल्यास शरीरामध्यें पुरुषाला परिच्छिन्न करण्याची योग्यताच नाहीं, ही अडचण उरणार नाहीं. ( सिद्धान्ती )=हें तुमचें म्हणणें अन्यत्व व सावयवत्व यांमुळें अयुक्त आहे. कारण दृष्टान्तांतील कारणभूत बीजाहून वृक्षावरील फलांतील बीजें निराळीं असतात. त्यामुळें ( बीजाच्या व्यक्ति भिन्न भिन्न असल्यामुळें ) फलानें आपल्या कारणाच्याहि कारणाला आपल्यामध्यें धारण करणें यांत कांहीं विरोध नाहीं. पण दार्ष्टान्तिकांत पुरुषाची व्यक्ति

एकच आहे. शरीराच्या कारणांचेंहि म्ह. कलांचेंहि कारण असा तो पुरुषच शरीरांत सांठवून राहिलेला आहे, ( अभ्यन्तरीकृत आहे ), असें श्रुतींत म्हटलें आहे. त्यामुळें कारणत्व व आपल्यामध्यें धारण करणें यांत विरोध आहे. आतां—कारणीभूत बीजच वृक्ष, फल व त्यांतील बीज या रूपानें परिणाम पावलेलें असल्यामुळें कारण बीज व कार्यबीज यांचें ऐक्य आहे, म्हणून जरी म्हटलें तरी तीं दोन्हीं ( कारण-कार्यें ) सावयव आहेत, त्यामुळें वृक्षाप्रमाणें फलाकारानें परिणाम पावलेल्या अवयवां-हून भिन्न अवयवांचाच त्यांतील बीजाकारानें परिणाम झालेला असतो. म्हणून फलाकारानें परिणाम पावणारे अवयव आधार व त्यांतील बीजाकारानें परिणाम पावणारे अवयव आधेय ( आधारानें राहणारी वस्तु ) होऊं शकतात. पण दार्ष्टान्तिकांत पुरुष निरवयव असल्यामुळें तसा आधार-आधेयभाव संभवत नाहीं. ( बीज सावयव असल्यामुळें त्याच्या कांहीं अवयवांपासून वृक्ष, फल इत्यादि परिणाम व कांहीं अवयवांपासून फलांतील बीज हा परिणाम होऊं शकतो. पण पुरुष निरवयव असल्यामुळें त्याचा एकदेशानें कलादि रूपानें परिणाम व एकदेशानें त्यांत राहणें, संभवत नाहीं—)=शिवाय पुरुषापासून परिणाम पावलेल्या कला सावयव असल्यामुळें परिच्छिन्न आहेत व स्वत: पुरुष अपरिच्छिन्न आहे. त्यामुळेंहि परिच्छिन्न अपरिच्छि-न्नाचा आधार होऊं शकत नाहीं. अथवा प्राणादि सोळा कला व शरीर सावयव आहेत. ( सावयव असल्यामुळेंच कार्यें आहेत. कार्यें उत्पत्तीपासून नाशापर्यंतच म्हणजे मध्य-अव-स्थेतच मात्र विद्यमान असल्यामुळें मिथ्या आहेत. तेव्हां तीं तसलीं मिथ्या कार्यें निर-वयव व त्यामुळेंच परमार्थ सत्य अशा पुरुषाचा आधार कशीं होणार ? वादी—अहो-पण, आकाशाचें कार्य, अशा शरीरांत अपरिच्छिन्न आकाशाचाहि अभ्यंतरीभाव अनु-भवास येतो ? सिद्धान्ती )=शरीर हें आकाशाचें कार्य नव्हे. तर तें नुस्तें शरीराकार होऊन राहतें, एवढेंच. कारण छिद्रादि आकाशस्वरूपानें विशिष्ट असलेल्या आकृ-तीलाच शरीर म्हणतात. त्यामुळें आकाश शरीरान्त:स्थ आहे, हें म्हणणें व्यर्थ होय. सारांश येणेंप्रमाणें शरीर आकाशाचा आधार आहे. हेंहि जर उपपन्न होत नाहीं तर आकाशाचेंहि कारण जो पुरुष त्याचा तें आधार कसें होणार ? तस्मात् वरील बीज-वृक्षाचा दृष्टान्त असमान—विषम आहे. ( सम नाहीं. )

**भाष्यं—किं दृष्टान्तेन वचनात्स्यादिति चेन्न । वचनस्याकारकत्वात् । न हि वचनं वस्तुनोऽन्यथाकरणे व्याप्रियते । किं तर्हि यथाभूतार्थावद्योतने । तस्मादन्त:शरीर इत्येतद्वचनमण्डस्यान्तर्व्योमेतिवच्च द्रष्टव्यं ॥**

**भाष्यार्थ**—(मध्यस्थ)-अहोपण, दृष्टान्तच काय करावयाचा आहे ? श्रुतीचें वचन प्रमाण असल्यामुळें ( वचनप्रामाण्यानेंच ) 'पुरुष शरीरांत अवस्थित होतो' हें म्हणणें युक्तियुक्त नसलें तरी मान्य करावें. ( सिद्धान्ती )=नाहीं. असें कधींहि म्हणतां येणार नाहीं. कारण वचनाला अकारकत्व आहे. श्रुतिवचनहि वस्तूच्या स्वरूपांत बदल पाडण्यास समर्थ नसतें. तें वस्तूच्या स्वरूपाशीं विरोध न येईल अशा रीतीनेंच बोध करण्याचा ( वस्तु जशी असेल तसेंच तिचें प्रकाशन करण्याचा ) प्रयत्न करितें. ( कारण तें वस्तूमध्येंहि अन्यथाभाव आणतें, असें म्हणल्यास श्रुत्यर्थाचा विचार करण्याचें कारणच नाहीं, असें होणार. )=तस्मात् 'अन्तःशरीरे'–म्हणजे शरीराच्या अंतर्भागीं हें वचन 'अंडयाच्या आंत आकाश' या वचनाप्रमाणें युक्त आहे, असें जाणावें. ( पुरुष शरीराचें उपादान असल्यामुळें शरीरास आंतून व बाहेरून व्यापून राहणारा तो शरीरान्तर्गत आहे, अशी प्रतीति येते व त्या अभिप्रायाचीच ही श्रुति आहे. अथवा ही श्रुति लोकांच्या भ्रमानें सिद्ध झालेल्या परिच्छिन्नत्वाचा अनुवाद करीत आहे, असें आतां भाष्यकार सांगतात–)

**भाष्यं—उपलब्धिनिमित्तत्वाच्च दर्शनश्रवणमननविज्ञानादिलिङ्गैरन्तःशरीरे परिच्छिन्न इव ह्युपलभ्यते पुरुष उपलभ्यते चात उच्यतेऽन्तःशरीरे सोम्य स पुरुष इति। न पुनराकाशकारणः सन्कुण्डबदरवच्छरीरपरिच्छिन्न इति मनसाऽपीच्छति वक्तुं मूढोऽपि किमुत प्रमाणभूता श्रुतिः ॥२॥**

**भाष्यार्थ**—शिवाय तो पुरुष उपलब्धीचें निमित्त आहे. तो या शरीरांत पाहणें, ऐकणें, मनन करणें, जाणणें इत्यादि लिंगांवरून परिच्छिन्न असल्यासारखा आढळतो. शिवाय तो शरीरांत अभिव्यक्त होत असतो. म्हणून श्रुतीनें 'येथेंच– या शरीरांत तो पुरुष आहे' असें म्हटलें आहे. अहो, एखादा मूढहि जर आकाशाचेंहि कारण असणारा पुरुष कुंडांतील बोरांप्रमाणें शरीरांत परिच्छिन्न आहे असें मनांतल्या मनांतहि म्हणण्याची इच्छा करणार नाहीं तर मग प्रमाणभूत श्रुति तसें कसें सांगेल !! २.

**श्रुतिः—स ईक्षांचक्रे। कस्मिन्नहमुत्क्रान्त उत्क्रान्तो भविष्यामि कस्मिन्वा प्रतिष्ठिते प्रतिष्ठास्यामीति ॥ ३ ॥**

**अर्थ**—तो ईक्षण–विचार करिता झाला. कोणता कर्ता उत्क्रान्त झाला असतां मी उत्क्रान्त होईन व कोण प्रतिष्ठित झाला असतां मी प्रतिष्ठित होईन ? ३.

**भाष्यं—यस्मिन्नेताः षोडश कलाः प्रभवन्तीत्युक्तं पुरुषविशेषणार्थं कलानां प्रभवः स चान्यार्थोऽपि श्रुतः केन क्रमेण स्यादित्यत इदमुच्यते—चेतनपूर्विका च सृष्टिरित्येवमर्थं च पुरुषः षोडशकलः पृष्टो यो भारद्वाजेन स ईक्षांचक्र**

**ईक्षणं दर्शनं चक्रे कृतवानित्यर्थः । सृष्टिफलक्रमादिविषयम् । कथमित्युच्यते कस्मिन्कर्तृविशेषे देहादुत्क्रान्त उत्क्रान्तो भविष्याम्यहमेवं कस्मिन्वा शरीरे प्रतिष्ठितेऽहं प्रतिष्ठास्यामि प्रतिष्ठितः स्यामित्यर्थः ॥**

**भाष्यार्थ**—' ज्याच्यामध्यें या सोळा कला उद्भवतात ' असें वर पुरुषाच्या विशेषणाकरितां सांगितलें. त्याच्यापासून होणाऱ्या कलांचा मायिक उद्भवहि सांगितला. पण तो अध्यारोपार्थ जरी सांगितलेला असला तरी तो कोणत्या क्रमानें होतो अशी आशंका राहूं नये म्हणून श्रुति असें सांगते–ही सृष्टि चेतनपूर्विका आहे. [ म्हणजे या जगांची उत्पत्ति चेतनपुरुषानें संकल्पपूर्वक केली आहे. हिच्या उत्पत्तीपूर्वी चेतन पुरुष होता. ती जडापासून झाली आहे व चेतन हा जडाचा धर्म आहे, असें नव्हे ] हें सांगण्याकरितांहि हा पुढील ब्राह्मणभाग आहे. ' स ईक्षांचक्रे '–भारद्वाजानें ज्या षोडशकल पुरुषाविषयीं प्रश्न केला आहे तो पुरुष ईक्षा करिता झाला. ईक्षा म्हणजे ईक्षण. ईक्षण म्हणजे दर्शन–विचार, संकल्प. त्यानें प्राणादिकांची सृष्टि, तिचें उत्क्रांत्यादि फल, प्राणापासून श्रद्धा इत्यादि क्रम, आधार-आधेयभाव इत्यादिकांविषयीं ईक्षण केलें, असा याचा इत्यर्थ. तें कसें म्हणून म्हणाल तर सांगतों–' कस्मिन्नहमुत्क्रान्ते०'–कोणता कर्तृविशेष ( विशेष प्रकारचा कर्ता ) या देहांतून उत्क्रांत झाला असतां ( यांतून निघून गेला असतां ) मी उत्क्रान्त होईन ? तसेंच ' कस्मिन्वा०'–शरीरांत कोण प्रतिष्ठित झाला असतां मी प्रतिष्ठित होईन ? असें त्यानें ईक्षण केलें, असा याचा अर्थ.

**भाष्यार्थ—नन्वात्माऽकर्ता प्रधानं कर्तृ । अतः पुरुषार्थं प्रयोजनमुररीकृत्य प्रधानं प्रवर्तते महदाद्याकारेण तत्रेदमनुपपन्नं पुरुषस्य स्वातन्त्र्येणेक्षापूर्वकं कर्तृत्ववचनम् ॥**

**भाष्यार्थ**—( सांख्य )–अहोपण, आत्मा अकर्ता असून प्रधान कर्तृ ( करणारें–क्रियाशक्तिमान् ) आहे. यास्तव पुरुषार्थ या प्रयोजनाचा अंगीकार करून, पुरुषाचा भोग व अपवर्ग या प्रयोजनास उद्देशून प्रधान महदादि-आकारानें प्रवृत्त होतें. तेव्हां असें असतांना पुरुष स्वतंत्रपणें ईक्षापूर्वक जगाला करितो, हें म्हणणें अनुपपन्न आहे. ( कारण प्रधान अचेतन जरी असलें तरी वासराची वृद्धि व्हावी, म्हणून गायीच्या शरीरांतील अचेतन दूध किंवा शेतांत उगवलेल्या धान्याच्या वृद्धीकरितां अचेतन जल जसें प्रवृत्त होतें, तसेंच पुरुषार्थाकरितां तें प्रवृत्त होतें, असें जाणावें. आत्म्याला कर्तृत्व आहे, असें जरी मानिलें तरी व्यवहारांतील कुंभारादि कर्त्याला जशी दंड, चक्र इत्यादि सहकारी कारणांची अपेक्षा असते त्याप्रमाणें यालाहि त्यांची अपेक्षा असणें उचित आहे. पण सृष्टीच्या पूर्वी त्यांचा अभाव असल्याकारणानें आणि आपल्याच

दुःखादि अनर्थास कारण होणाऱ्या प्राणादि संसाराचें कर्तृत्वहि त्याच्या ठिकाणीं उपपन्न होत नसल्यासुळें त्याला स्रष्टा म्हणणें अगदींच अनुचित आहे. (मध्यस्थ सांख्याला म्हणतो–" अहोपण, सृष्टीच्या पूर्वी तुमचें प्रधानहि एकटेंच असतें. त्यामुळें त्यालाहि दुसरें सहकारी कारण नसतें. तेव्हां प्रधान तरी सृष्टीचें कारण–कर्तृ कसें होणार ? यास्तव अन्य गतिच नसल्याकारणानें चेतनालाच कसें तरी कर्तृत्व आहे, असें समजावें.)

**भाष्यं—सत्त्वादिगुणसाम्ये प्रधाने प्रमाणोपपन्ने सृष्टिकर्तरि सतीश्वरेच्छानुवर्तिषु वा परमाणुषु सत्स्वात्मनोऽप्येकत्वेन कर्तृत्वे साधनाभावात्मन आत्मन्यनर्थकर्तृत्वानुपपत्तेश्च । न हि चेतनावान्बुद्धिपूर्वकार्यात्मनोऽनर्थं कुर्यात् ॥**

**भाष्यार्थ**—( सांख्य )–सत्त्व, रज व तम या त्रिगुणांचें साम्य, असें प्रमाणतः सिद्ध झालेलें प्रधान सृष्टि करणारें असतांना किंवा ( नैयायिकांच्या मताप्रमाणें ) ईश्वराच्या इच्छेप्रमाणें अनुवर्तन करणारे परमाणु असतांना एका आत्म्यालाच कर्तृत्व आहे असें समजणें अनुपपन्न आहे. कारण तोहि एक असल्यामुळें त्याच्यापाशीं दुसरें साधन नसतें. शिवाय आत्मा आपणच आपल्या अनर्थांचा कर्ता होईल, हें न्याय्य दिसत नाहीं. कारण चेतनावान् व बुद्धिपूर्व प्रवृत्ति करणारा कोणीहि आपलाच अनर्थ उत्पन्न करणार नाहीं. ( ' सत्त्वादि तीन गुणांची साम्यावस्था हेंच प्रधान आहे ' असें सांख्यांचें मत आहे. यास्तव सत्त्वादि गुणांच्या योगानें अनेकात्मक झालेल्या प्रधानाला जगाचें कर्तृत्व असणें युक्तच आहे. अर्थात् तुम्ही समजतां तशी अन्य गतिच नाहीं, असें नाहीं. तस्मात् पुरुष कर्ता आहे, हें म्हणणें अयुक्त आहे. पण ' चेतन ज्याचा अधिष्ठाता नाहीं अशा अचेतनाची प्रवृत्तिच कोठें आढळत नाहीं ' म्हणून म्हणाल, तर परमाणुकारणवाद माना. कारण त्या वादांत ईश्वर अधिष्ठाता आहे, असा याचा भावार्थ. मध्यस्थ–असें जरी समजलें तरी श्रुतीमध्यें त्यानें ईक्षण केलें असें जें सांगितलें आहे त्याची वाट काय ? अचेतन प्रधान ईक्षण कसें करूं शकेल ?)

**भाष्यं—तस्मात्पुरुषार्थेन प्रयोजनेनेक्षापूर्वकमिव नियतक्रमेण प्रवर्तमानेऽचेतने प्रधाने चेतनवदुपचारोऽयं "स ईक्षांचक्रे" इत्यादिः । यथा राज्ञः सर्वार्थकारिणि भृत्ये राजेति तद्वत् ॥**

**भाष्यार्थ**—(सांख्य–प्रधानाचें तें ईक्षण मुख्य नव्हे. गौण आहे.)=तस्मात्–म्हणून भोग व अपवर्ग–मोक्ष या पुरुषाच्या प्रयोजनास उद्देशून जणुंकाय ईक्षापूर्वकच–संकल्पपूर्वकच नियत क्रमानें प्रवृत्त होणाऱ्या अचेतन प्रधानाचे ठिकाणीं ' तो ईक्षा करिता झाला ' हा चेतनाप्रमाणें उपचार केला आहे. ( उपचार म्हणजे गौण शब्दप्रयोग. मुख्य ईक्षणकर्त्याचे ठिकाणीं आढळणाऱ्या नियमित क्रमानें प्रवृत्त होणें, या गुणामुळें प्रधानाचे ठिकाणीं–' ईक्षण केलें ' असा गौण प्रयोग केला आहे. एखादा ब्रह्मचारी अग्नीसारखा पिंगल वर्ण असला म्हणजे त्याला जसें अग्नि म्हणतात त्याप्रमाणें,

मध्यस्थ–असें जरी समजलें तरी गौण ईक्षणशब्दभाक् प्रधानाचे ठिकाणीं पुरुषशब्द उपपन्न होत नाहीं. सांख्य–)=राजाचें सर्व कार्य करणाऱ्या प्रधानादि भृत्याला लोक जसे राजा म्हणतात तसेंच, पुरुषाच्या भोगापवर्गास करणाऱ्या प्रधानाला येथें पुरुष असें गौणवृत्तीनेंच म्हटलें आहे.

**भाष्यं**––न । आत्मनो भोक्तृत्ववत्कर्तृत्वोपपत्तेः । यथा सांख्यस्य चिन्मात्रस्यापरिणामिनोऽप्यात्मनो भोक्तृत्वं तद्वद्वेदवादिनामीक्षादिपूर्वकं जगत्कर्तृत्वमुपपन्नं श्रुतिप्रामाण्यात् ॥

**भाष्यार्थ**––( सिद्धान्ती )–हें तुमचें उपपादन अगदीं अयुक्त आहे. कारण पुरुषाच्या भोक्तृत्वाप्रमाणेंच कर्तृत्वहि उपपन्न आहे. ज्याप्रमाणें सांख्यांच्या मतीं अपरिणामी चिन्मात्र आत्म्यालाहि भोक्तृत्व आहे तसेंच आम्हां वेदवाद्यांच्या मतीं श्रुतिप्रामाण्यामुळें ईक्षणादिपूर्वक जगत्कर्तृत्व उपपन्न आहे. (आत्मा स्वतः अकर्ता जरी असला तरी त्याच्या ठिकाणीं मायोपाधिक कर्तृत्व संभवतें, हें मनांत धरून प्रथम येथें आपाततः–सामान्यतः–प्रतिबंदीनें सांख्यांचा परिहार केला आहे. प्रकृत एका कल्पांत प्रवृत्त झालेल्या पुरुषास उद्देशून त्याच न्यायानें त्याच्यावर दुसऱ्या कल्पाची प्राप्ति होते, असें दाखविणें, ही प्रतिबंदी होय. जसें–अपरिणामी पुरुष भोक्ता आहे, असें म्हटलें असतां तो कर्ताहि आहे, असें ठरणें. सांख्य 'बुद्धि कर्त्री व पुरुष भोक्ता' असें म्हणतात, हें प्रसिद्धच आहे. वेदवेत्ते म्हणतात कीं, श्रुति स्वतःप्रमाण असल्यामुळें तिनें सांगितलेल्या अविकारी चेतनाच्या कर्तृत्वाचाहि कसा तरी निर्वाह करणें, आम्हांला प्राप्त आहे.)

**भाष्यं**––तत्त्वान्तरपरिणाम आत्मनोऽनित्यत्वाशुद्धत्वानेकत्वनिमित्तो न चिन्मात्रस्वरूपविक्रियाऽतः पुरुषस्य स्वात्मन्येव भोक्तृत्वे चिन्मात्रस्वरूपविक्रिया न दोषाय । भवतां पुनर्वेदवादिनां सृष्टिकर्तृत्वे तत्त्वान्तरपरिणाम एवेत्यात्मनोऽनित्यत्वादिसर्वदोषप्रसङ्ग इति चेत् ॥

**भाष्यार्थ**––( सांख्य–भोग म्हणजे सुख व दुःख यांचा अनुभव. तो तर पुरुषाच्या स्वरूपभूत आहे. यास्तव त्याला तत्त्वान्तरापत्तिलक्षण परिणाम म्हणतां येत नाहीं. परिणाम म्हणजे पूर्व रूप जाऊन दुसरें रूप प्राप्त होणें. यास्तव )=आत्म्याचा तत्त्वान्तर परिणाम होऊन त्यामध्यें दुसरें सजातीय किंवा विजातीय रूप आल्यास तें त्याच्या अनित्यत्व, अशुद्धत्व, अनेकत्व इत्यादिकांस निमित्त होईल, पण चिन्मात्रस्वरूप विक्रिया अशुद्धत्वादिकांचें निमित्त होत नाहीं. यास्तव ( आमच्या मतीं ) पुरुषाच्या स्वरूपांतच भोक्तृत्वामुळें चिन्मात्रस्वरूप विक्रिया जरी झाली तरी ती कोणत्याहि दोषाला कारण होत नाहीं. पण तुम्हां वेदवाद्यांच्या मतीं त्याला सृष्टिकर्तृत्व आहे, असें म्हटलें कीं तत्त्वान्तर परिणाम होतोच. त्यामुळें आत्म्याचे ठायीं अनित्यत्वादि सर्व दोष येतात.

**भाष्यं—न । एकस्याप्यात्मनोऽविद्यायां विषयनामरूपोपाध्यनुपाधिकृतविशेषाभ्युपगमादविद्याकृतनामरूपोपाधिकृतो हि विशेषोऽभ्युपगम्यत आत्मनो बन्धमोक्षादिशास्त्रकृतसंव्यवहाराय परमार्थतोऽनुपाधिकृतं च तत्त्वमेकमेवाद्वितीयमुपादेयं सर्वतार्किकबुद्ध्यनवग्राह्यमभयं शिवमिष्यते न तत्र कर्तृत्वं भोक्तृत्वं वा क्रियाकारकफलं च स्यादद्वैतत्वात्सर्वभावानाम् ॥**

**भाष्यार्थ**—(सिद्धान्ती)–हें तुमचें म्हणणें व्यर्थ आहे. कारण आत्मा वस्तुत: एक, असहाय, अकर्ता व आप्तकाम जरी आहे तरी अविद्यावस्थेंत विषय, नाम, रूप इत्यादि उपाधि व अनुपाधि ( उपाधिरहित अवस्था ) यांच्या योगानें त्याच्या ठिकाणीं विशेष उद्भवतो, असा आमचा अभ्युपगम आहे. अविद्याकृत नाम-रूप-उपाधींमुळें आत्म्याचे ठिकाणीं प्राप्त होणारा विशेष बंध, मोक्ष इत्यादि शास्त्रकृत संव्यवहाराकरितां स्वीकारलेला आहे. पण आम्ही परमार्थत: अनुपाधिकृत तत्त्व एकच अद्वितीय, उपादेय (ग्राह्य), सर्व तार्किकांच्या बुद्धीचा विषय न होणारें, अभय व शिव मानीत असतों. त्यामुळें त्यांत कर्तृत्व, भोक्तृत्व, व क्रिया-कारक-फल असत नाहीं. कारण अनुपाधिकृत दशेंत सर्व भावांचें अद्वैतत्व असतें. ( अर्थात् आमच्या मतीं उपाधिकृत कर्तृत्व, अविद्येचें साहाय्य, आणि भ्रांतीनें स्वभिन्न व अनाप्तकाम जीव यांचा संभव असल्यामुळें अनाप्तकाम जीवांच्या पुरुपार्थाकरितां तसल्याहि आप्तकाम आत्म्याच्या ठायीं स्रष्टृत्व उपपन्न होतें. चेतन ज्याचा अधिष्ठाता नाहीं अशा अचेतनाच्या ठिकाणीं मात्र तें स्रष्टृत्व मुळींच उपपन्न होत नाहीं, असा याचा भावार्थ. )

**भाष्यं—सांख्यास्त्वविद्याध्यारोपितमेव पुरुषे कर्तृत्वं क्रिया कारकं फलं चेति कल्पयित्वाऽऽगमबाह्यत्वात्पुनस्ततस्त्रस्यन्त: परमार्थत एव भोक्तृत्वं पुरुषस्येच्छन्ति तत्त्वान्तरं च प्रधानं पुरुषात्परमार्थवस्तुभूतमेव कल्पयन्तोऽन्यतार्किककृतबुद्धिविषया: सन्तो विहन्यन्ते ॥**

**भाष्यार्थ**—पण सांख्य पुरुषाचे ठिकाणीं अविद्याध्यारोपितच कर्तृत्व व क्रिया-कारक-फल कल्पावयास प्रवृत्त झालेले असून स्वत: आगमबाह्य असल्यामुळें पुनरपि त्याला भिऊन पुरुषाचें भोक्तृत्व वास्तविकच मानूं लागले;तुम्ही प्रधान हें पुरुषाहून निराळें परमार्थ वस्तुभूत तत्त्व आहे,अशी कल्पना केलीत; आणि त्यामुळेंच अन्य तार्किकांच्या तर्कांचे विषय होऊन स्वसिद्धान्तापासून भ्रंश पावलांत ! ! ( पुरुष निर्विशेष असल्यामुळें वस्तुत: त्याचे ठिकाणीं कर्तृत्वादिकाचा संभव नाहीं. त्यामुळें तें आरोपितच आहे, अशी कल्पना करण्यास तुम्ही जरी प्रथम प्रवृत्त झालां होतां तरी सर्व विरोधांचा निरास करणाऱ्या केवल आगमप्रमाणाचाच आश्रय केलेला नसल्यामुळें प्रत्यक्षादिकांशीं विरोध येतो, असें पाहतांच स्रष्टृत्वादि आरोपित आहे, या सिद्धान्तास भिऊन तें सर्व परमार्थ

सत्य आहे, असेंच समजूं लागलां. तथापि अचेतनाला भोक्तृत्व संभवत नसल्यामुळें तें–भोक्तृत्व मात्र आत्म्याचा धर्म आहे, बाकी कर्तृत्वादि दुसरें सर्व प्रधानाचें आहे, असें मानिलेंत. पण ' तुम्ही चेतनाच्या ठिकाणीं भोक्तृत्व जसें मानितां तसेंच कर्तृत्वहि मानण्यास कोणता प्रत्यवाय आहे ? ' असें दुसऱ्या तार्किकांनीं शिकविलें असतां तुम्ही सांख्य स्वमतापासून च्युत होतां; असा याचा भावार्थ.

**भाष्यं—तथेतरे तार्किकाः सांख्यैरित्येवं परस्परविरुद्धार्थकल्पनात आमिषार्थिन इव प्राणिनोऽन्योन्यविरुद्धमानार्थदर्शित्वाद्दूरमेवापकृष्यन्तेऽऽतस्तन्मतमनादृत्य वेदान्तार्थतत्त्वमेकत्वदर्शनं प्रत्यादरवन्तो मुमुक्षवः स्युरिति तार्किकमतदोषप्रदर्शनं किंचिदुच्यतेऽस्माभिर्न तु तार्किकवत्तात्पर्येण । तथैतदत्रोक्तम्–"विवदत्स्वेव निक्षिप्य विरोधोद्भवकारणम् । तैः संरक्षितसद्बुद्धिः सुखं निर्वाति वेदवित्" इति ॥**

**भाष्यार्थ**—( मध्यस्थ–अहो पण असें जर आहे तर सांख्यांना शिकविणाऱ्या तार्किकांचेंच मत ग्राह्य समजावें ! सिद्धान्ती )=पण सांख्य तरी कमी कोठें आहेत ? ते त्या दुसऱ्या तार्किकांचे गुरु होऊन त्यांनाहि शिकवितात. ( त्यामुळें त्यांतील कोणत्याच तार्किकांचें मत ग्राह्य नाहीं, असें आतां सुचवितात– )=सारांश याप्रमाणें परस्पर विरुद्ध अर्थांची कल्पना केल्यामुळें, मांसार्थी प्राण्यांप्रमाणें, ते सर्व परस्परांच्या विरुद्ध प्रमाणार्थ दाखवूं लागल्या कारणानें परमार्थ तत्त्वापासून दूर आकर्षण केले जातात. यास्तव मुमुक्षूंनीं त्यांच्या मताचा अनादर करून वेदान्तार्थ तत्त्वाचा म्हणजेच एकत्वदर्शनाचा आदर करावा, म्हणून आम्ही तार्किकमतावर येणाऱ्या दोषांचें थोडेंसें प्रदर्शन करीत असतों. इतर तार्किकांप्रमाणें तात्पर्यतः तें करीत नाहीं. 'विवदत्स्वेव०' इत्यादि या पुढील वाक्यांत तेंच सांगितलें आहे. त्याचा अर्थ–भेद सत्य आहे, असें समजणें हें विरोधाच्या उद्भवाचें कारण आहे. तें विवाद करणाऱ्या तार्किकांच्या ठिकाणीं ठेवून त्या वाद्यांनींच ज्याच्या सद्बुद्धीचें संरक्षण केलें आहे असा वेदवेत्ता सर्व विकल्पशून्य होऊन परम शांतीचा उपभोग घेतो. ( भेददर्शनच परस्परांनीं परस्परांवर दिलेल्या दोषांनीं ग्रस्त झालेलें असल्यामुळें अभेददर्शनच निर्दोष आहे, अशी वेदवेत्त्यांची निश्चित बुद्धि होते व त्यामुळें त्याला अवर्णनीय समाधान वाटतें, असा याचा इत्यर्थ.)

**भाष्यं—किं च भोक्तृत्वकर्तृत्वयोर्विक्रिययोर्विशेषानुपपत्तिः । का नामासौ कर्तृत्वाज्जात्यन्तरभूता भोक्तृत्वविशिष्टा विक्रिया यतो भोक्तैव पुरुषः कल्प्यते न कर्ता प्रधानं तु कर्त्रेव न भोक्त्रिति ॥**

**भाष्यार्थ**—( पक्षाभिमान सोडून विचार केल्यास कर्तृत्वादिक आरोपित आहे, असें सांख्यवाद्यांनाहि कळेल, असें आतां सांगतात– )=शिवाय भोक्तृत्व व कर्तृत्व या

दोन्ही जर विक्रिया आहेत तर त्यांमध्यें कांहीं विशेष असणें युक्त दिसत नाहीं. कर्तृत्वाहून निराळ्या जातीची भोक्तृत्वविशिष्ट विक्रिया ती कोणती कीं जिच्या योगानें पुरुष केवल भोक्ताच आहे कर्ता नव्हे व प्रधान केवल कर्तृ आहे भोक्तृ नव्हे, अशी कल्पना केली जाते !

**भाष्यं—ननूक्तं पुरुषश्चिन्मात्र एव स च स्वात्मस्थो विक्रियते भुञ्जानो न तत्त्वान्तरपरिणामेन । प्रधानं तु तत्त्वान्तरपरिणामेन विक्रियतेऽतोऽनेकमशुद्धमचेतनं चेत्यादिधर्मवत्तद्विपरीतः पुरुषः ॥**

**भाष्यार्थ**—(मध्यस्थ)-याचें उत्तर सांख्यांनीं वर दिलें आहे–पुरुष केवल चिन्मात्रच आहे.तो भोग घेत असतांना स्वरूपांतच स्थित होऊन (चिद्रूपानेंच) विकार पावतो.तत्त्वान्तरपरिणामानें विकार पावत नाहीं. परंतु प्रधान तत्त्वान्तरपरिणामानें ( अनेकत्व अशुद्धत्व इत्यादिकांनीं युक्त असलेल्या स्वविलक्षण महत्तत्त्व, पंचतन्मात्र इत्यादि भिन्न स्वरूपानें ) विकार पावतें. त्यामुळें तें अनेक, अशुद्ध, अचेतन इत्यादि धर्मयुक्त व पुरुष त्याच्या विपरीत आहे. ( कारण तो चिद्रूपानेंच परिणाम पावत असल्यामुळें त्याच्या ठिकाणीं रूपांतरप्राप्ति अथवा अशुद्ध्यादि दोष येत नाहींत. )

**भाष्यं—नासौ विशेषो वाङ्मात्रत्वात् । प्राग्भोगोत्पत्तेः केवलचिन्मात्रस्य पुरुषस्य भोक्तृत्वं नाम विशेषो भोगोत्पत्तिकाले चेज्जायते निवृत्ते च भोगे पुनस्तद्विशेषादपेतश्चिन्मात्र एव भवतीति चेन्महदाद्याकारेण च परिणम्य प्रधानं ततोऽपेत्य पुनः प्रधानं स्वरूपेणावतिष्ठत इत्यस्यां कल्पनायां न कश्चिद्विशेष इति वाङ्मात्रेण प्रधानपुरुषयोर्विशिष्टविक्रिया कल्प्यते ॥**

**भाष्यार्थ**—(सिद्धान्ती)-हा कांहीं मोठासा विशेष नव्हे. कारण तो वाङ्मात्र–शब्दमात्र आहे. ( आतां भाष्यकार याच संग्रहवाक्याचें विवरण करितात–)=भोगोत्पत्तीच्या पूर्वी केवल चिन्मात्र असलेल्या पुरुषाचा भोक्तृत्वनामक विशेष भोगोत्पत्तिसमयीं उत्पन्न होतो व भोग निवृत्त झाला असतां त्या विशेषापासून दूर झालेला पुरुष पुन: पूर्ववत् चिन्मात्रच होतो, असें म्हटल्यास प्रधानहि महत्, तन्मात्र इत्यादि आकारानें परिणाम पावून व त्यानंतर पुन: त्यापासून दूर होऊन स्वरूपानें राहतें. अर्थात् या दोन कल्पनांमध्यें विशेष कांहीं नाहीं. (म्हणजे वरील कल्पना व ही कल्पना सारखीच; त्या दोन कल्पनांमध्यें विशेष कांहींच नाहीं. )=यास्तव तुम्ही सांख्य प्रधान व पुरुष यांची विशिष्ट विक्रिया ( म्हणजे पुरुषाला नुस्ती भोक्तृत्व हीच विक्रिया होते व प्रधानाला कर्तृत्व विक्रिया होते हा भेद)केवल वाङ्मात्र कल्पितां.(कारण पुरुषामध्यें चिद्रूपानेंच विक्रिया होते व प्रधानांत तत्त्वान्तररूपानें ती होते, अशी कल्पना जरी केली तरी विचार करून पाहिलें असतां त्यांत अर्थतः कांहीं विशेष आढळत नाहीं, असा भावार्थ.)

**भाष्यं—अथ भोगकालेऽपि चिन्मात्र एव प्राग्वत्पुरुष इति चेत्। न तर्हि परमार्थतो भोगः पुरुषस्य ॥**

**भाष्यार्थ**—( परिणाम स्वरूपतः होवो कीं तत्त्वान्तररूपानें होवो, पण तो आगंतुक आहे, असें म्हटल्यास अनित्यत्वादि दोष येऊन पुरुष व प्रकृति यांत कांहीं विशेष उरत नाहीं, असें वर सांगितलें. आतां तो आगंतुक नाहीं असें म्हटल्यास कोणती अडचण येते तें सांगतात–)=बरें भोगकालींहि पुरुष पूर्ववत् चिन्मात्रच असतो म्हणून म्हणाल तर मग पुरुषाचा भोग परमार्थतः–खरा नव्हे, असें होईल !

**भाष्यं—भोगकाले चिन्मात्रस्य विक्रिया परमार्थैव तेन भोगः पुरुषस्येति चेत्। न। प्रधानस्यापि भोगकाले विक्रियावत्त्वाद्भोक्तृत्वप्रसङ्गः। चिन्मात्रस्यैव विक्रिया भोक्तृत्वमिति चेदौष्ण्याद्यसाधारणधर्मवतामग्न्यादीनामभोक्तृत्वे हेत्वनुपपत्तिः ॥**

**भाष्यार्थ**—पण भोगसमयीं चिन्मात्र पुरुषाचे ठिकाणीं जी विक्रिया होते ती परमार्थच असते. त्यामुळें पुरुषाला भोग होतो. ( भोगकालची केवल विक्रिया हाच भोग होय व तो केवल पुरुषालाच होतो; प्रधानाला होत नाहीं. यास्तव पुरुषाचे ठिकाणीं भोगाचें सत्त्व व प्रधानाचे ठिकाणीं त्याचें असत्त्व, हा एवढाच त्या दोहोंमध्यें विशेष आहे, असा याचा भावार्थ. सिद्धान्ती )=हें म्हणणें अयुक्त आहे. कारण भोगसमयीं प्रधानालाहि विक्रिया होत असते. त्यामुळें त्याच्या ठिकाणीं भोक्तृत्वाचा प्रसंग येतो. [तुमच्या म्हणण्याप्रमाणें भोगकालीं होणारा विकार हाच भोग, असें जरी मानिलें तरी भोगकालीन सर्व विकारांना भोग म्हणावयाचें कीं, केवल चिन्मात्राच्या ठिकाणीं त्यावेळीं होणाऱ्या विकाराला भोग म्हणावयाचें ? तत्कालीन सर्व विक्रियांना भोग म्हणावयाचें, असें ठरल्यास प्रधानहि भोगसमयीं सुख व दुःख यांच्या आकारानें विकार पावत असल्यामुळें तोहि भोग होईल, असा याचा भावार्थ. ]=बरें ( दुसरा पक्ष स्वीकारल्यास म्हणजे ) चिन्मात्राच्या स्वरूपांतच होणारा विकार म्हणजे त्याच्या ठिकाणचा असाधारण धर्म हेंच भोक्तृत्व आहे, असें म्हटल्यास उष्णत्वादि असाधारण धर्मांनीं युक्त असलेल्या अग्निप्रभृति पदार्थांना भोक्तृत्व कां असूं नये, याचें योग्य कारण दाखवितां येत नाहीं. ( प्रधानामध्यें सुखादिरूप परिणाम झाल्यावांचून भोगाची सिद्धि होत नाहीं. यास्तव दुसऱ्या पदार्थांतील विकाराची अपेक्षा न करितां चैतन्यांत होणारी विक्रिया हाच भोग, असें म्हणतां येत नाहीं. बरें चैतन्यामध्यें होणाऱ्या असाधारण –विशेष विकारालाच भोग म्हणावें तर तसें समजण्यासहि कांहीं प्रबल कारण नसल्यामुळें प्रत्येक वस्तूंतील असाधारण विकार हा भोग आहे, असें ठरून अग्नीचें उष्णत्व हा अग्नीचा भोग, जलाचें शैत्य हा जलाचा भोग, इत्यादि सर्व वस्तु आपापल्या

असाधारण-धर्मामुळें विक्रियेमुळें भोक्ते होतील. शिवाय भोगकालचें असाधारण विक्रियावत्त्व प्रधानालाहि आहे. त्यामुळें तेंहि भोक्ता होईल, असा याचा इत्यर्थ. )

**भाष्यं--प्रधानपुरुषयोर्द्वयोर्युगपद्भोक्तृत्वमिति चेत् । न । प्रधानस्य पारार्थ्यानुपपत्तेः । न हि भोक्त्रोर्द्वयोरितरेतरगुणप्रधानभाव उपपद्यते प्रकाशयोरिवेतरेतरप्रकाशने ॥**

**भाष्यार्थ-सांख्य**-[आम्ही भोगाच्या वेळच्या असाधारण विकाराला भोग म्हणत नाहीं. तर साधारण विकारालाच भोग म्हणतों; अग्नि इत्यादि इतर पदार्थांना नियमानें भोगसमर्थीच विक्रिया होत नाहीं. प्रधानाला मात्र होते. पण आम्ही वरील दोष येऊं नये म्हणून आतां प्रधान व पुरुष या दोहोंना एकाच वेळीं भोक्तृत्व असतें, असें म्हणतों.] **सिद्धान्ती**--प्रधान व पुरुष या दोहोंनाहि एकाच वेळीं भोक्तृत्व आहे, असें म्हटलेंत कीं प्रधान पुरुषाकरितां प्रवृत्त होणारें आहे, म्हणजे तें परार्थ आहे, हें म्हणणें अयुक्त होईल ! कारण प्रधान व पुरुष हे दोन्ही जर भोक्ते तर त्यांना परस्पर गुणप्रधानभाव उपपन्न होत नाहीं. दोन प्रकाशांतील एक प्रकाश दुसऱ्या प्रकाशाचा प्रकाश्य ( विषय ) व दुसरा त्याचा प्रकाशक ( विषयी ) असें होणें जसें युक्त नव्हे त्याचप्रमाणें प्रधान व पुरुष हीं दोन्ही जर भोक्तृत्वधर्मयुक्त आहेत तर त्यांतील एकदा एकानें व दुसऱ्या वेळीं दुसऱ्यानें गौण व्हावें आणि एकदा दुसऱ्यानें व दुसऱ्या वेळीं पहिल्यानें मुख्य व्हावें, हें म्हणणें युक्त नव्हे.

**भाष्यं—भोगधर्मवति सत्त्वाङ्गिनि चेतसि पुरुषस्य चैतन्यप्रतिबिम्बोदयोऽविक्रियस्य पुरुषस्य भोक्तृत्वमिति चेत् । न पुरुषस्य विशेषाभावे भोक्तृत्वकल्पनानर्थक्यात् । भोगरूपश्चेदनर्थः पुरुषस्य नास्ति सदा निर्विशेषत्वात्पुरुषस्य कस्यापनयनार्थं मोक्षसाधनं शास्त्रं प्रणीयते । अविद्याध्यारोपितानर्थापनयनाय शास्त्रप्रणयनमिति चेत्परमार्थतः पुरुषो भोक्तैव न कर्ता प्रधानं कर्त्रेव न भोक्तृ परमार्थसद्वस्त्वन्तरं पुरुषाच्चेतीयं कल्पनाऽऽगमबाह्या व्यर्था निर्हेतुका चेति नाऽऽदर्तव्या मुमुक्षुभिः ॥**

**भाष्यार्थ**—( सांख्य )-अहोपण, भोग हा सत्त्वगुणप्रधान चित्तरूपानें परिणाम पावलेल्या प्रकृतीचाच धर्म आहे. कारण प्रकृतीमध्यें विकार होऊं शकतो. तो-भोग पुरुषाचा विकार नव्हे. कारण पुरुष अविक्रिय आहे. यास्तव तशा प्रकारच्या म्हणजे भोगधर्मयुक्त सत्त्वगुणप्रधान चित्तांत चैतन्यप्रतिबिंबाचा उदय होणें, हेंच अविक्रिय पुरुषाचें भोक्तृत्व आहे, [ सिद्धान्ती-असें जर आहे तर चित्तांतील भोगानें पुरुषाच्या ठिकाणीं कांहीं विशेष उत्पन्न होतो कीं नाहीं ? चित्तगत भोगानें पुरुषामध्यें कांहीं विशेष उत्पन्न होत नाहीं, ] म्हणून म्हणाल तर विशेषाच्या अभावीं पुरुषाच्या भोक्तृत्वाची कल्पना व्यर्थ होईल. शिवाय पुरुष सदा निर्विशेष असल्यामुळें भोगरूप अनर्थ जर

पुरुषाला नाहीं तर कशाचा अपनय ( निरसन ) करण्याकरितां तुम्ही आपलें शास्त्र म्हणजे मोक्षाचें साधन निर्माण करितां ? ( बरें चित्तगत भोगानें चैतन्याचे ठिकाणी विशेष उत्पन्न होतो व तो अविद्याध्यारोपित आहे, सत्य नव्हे, अर्थात् )=अविद्याध्यारोपित अनर्थाचा अपनय करण्याकरितां आम्ही शास्त्र निर्माण करितों, असें म्हणाल तर परमार्थत: पुरुष भोक्ताच आहे, कर्ता नव्हे. प्रधान नुस्तें कर्तृ ( करणारें ) आहे, भोक्तृ नव्हे, आणि प्रधान ही पुरुषाहून निराळी परमार्थत: सद्वस्तु ( सत्य, विद्यमान वस्तु ) आहे, ही कल्पना वेदबाह्य, व्यर्थ व निर्हेतुक आहे, असें होतें. यास्तव मुमुक्षूंनीं—मुक्त होण्याची ज्यांची इच्छा असेल त्यांनीं तिचा आदर करूं नये. ( भोगरूप अनर्थ जर अविद्येमुळें चैतन्यावर आरोपित आहे तर कर्तृत्वादि दुसरे सर्व विशेष व प्रधानादिक या सर्वांनाहि आरोपत्व आहे, असेंच समजावें. अर्धा आरोप, अर्धा परमार्थ असा घोटाळा करूं नये. कारण आम्ही सांगतों त्याप्रमाणें बंध-मोक्षव्यवहाराची सिद्धि होऊं शकते. तुम्ही म्हणतां तशी कल्पना केल्यास तिचें कांहीं प्रयोजन नाहीं, तिला कांहीं प्रमाण नाहीं, उलट सर्व श्रुतींशीं विरोध मात्र येतो. ज्याला मोक्षाची इच्छा असेल त्यानें सांख्यांच्या वेदविरुद्ध मताचा आदर करूं नये, हें सुचविण्याकरितांच आम्हीं त्यांच्या मतावर वरील सर्व दोष दिले आहेत. द्वेष, पक्षपात इत्यादि कारणानें नव्हेत. )

**भाष्यं—एकत्वेऽपि शास्त्रप्रणयनाद्यानर्थक्यमिति चेत् । न । अभावात् । सत्सु हि शास्त्रप्रणेत्रादिषु तत्फलार्थिषु च शास्त्रस्य प्रणयनमनर्थकं सार्थकं वेति विकल्पना स्यात् । न ह्यात्मैकत्वे शास्त्रप्रणेत्रादयस्ततो भिन्नाः सन्ति तदभाव एवं विकल्पनैवानुपपन्ना । अभ्युपगत आत्मैकत्वे प्रमाणार्थश्चाभ्युपगतो भवता यदात्मैकत्वमभ्युपगच्छता । तदभ्युपगमे च विकल्पानुपपत्तिमाह शास्त्रं " यत्र त्वस्य सर्वमात्मैवाभूत्तत्केन कं पश्येत् " इत्यादि । शास्त्रप्रणयनाद्युपपत्तिं चाऽऽहान्यत्र परमार्थवस्तुस्वरूपादविद्याविषये । " यत्र हि द्वैतमिव भवति" इत्यादि विस्तरतो वाजसनेयके ॥**

**भाष्यार्थ**—(मध्यस्थ)—अहोपण, आत्मा एक आहे, या तुमच्या पक्षींहि निरसनीय बंधाचा अभाव असल्यामुळें शास्त्रप्रणयनादिक व्यर्थ आहे असें होतें ? (सिद्धान्ती)—तसें मुळींच होत नाहीं. कारण ज्याला आत्म्याच्या एकत्वाचा निश्चय झाला आहे त्याच्याकरितां शास्त्राचें प्रणयनच नसल्यामुळें आनर्थक्य दोष येत नाहीं. कारण शास्त्रप्रणेत्रादिक ( शास्त्र निर्माण करणारे इत्यादिक ) व त्याच्या फलाची इच्छा करणारे जर असले तरच शास्त्र अनर्थक आहे किंवा सार्थक आहे ही विशेष कल्पना होणार ? पण आत्म्याचें एकत्व निश्चित झालें असतां शास्त्रकर्ते इत्यादि त्याहून पृथक् नसतात आणि

त्यांच्या अभावीं वरील कल्पनाच अनुपपन्न होते. शिवाय आत्म्याच्या एकत्वाचा निश्चय झाला असतां, त्या निश्चयाचें उत्पादक शास्त्र अर्थवत् आहे, व्यर्थ नाहीं, ही गोष्ट स्वानुभवानें सिद्ध होत असल्यामुळें वरील शंकाच उरत नाहीं. आत्म्याच्या एकत्वाचा निश्चय झाला असतां शास्त्राच्या आनर्थक्याच्या कल्पनेचीच अनुपपत्ति होते असें 'यत्र त्वस्य सर्वमात्मैवाभूत्तत्केन कं पश्येत्' इत्यादि शास्त्र सांगतें. "ज्यावेळीं अथवा ज्या दशेंत या पुरुषाला सर्व आत्माच आहे, असें होतें तेव्हां तो कोणत्या साधनानें कोणाला पाहणार?" असा त्या शास्त्रवचनाचा अर्थ आहे. पण परमार्थ वस्तुस्वरूपाहून अन्य अविद्याविषयांत म्हणजे जेव्हां तसा एकत्वभावनिश्चय नसतो तेव्हां निरसन करण्यास योग्य असा आरोपित बंध विद्यमान असल्यामुळें शास्त्रप्रणयनादिकांची उपपत्ति 'यत्र हि द्वैतमिव भवति' इत्यादि शास्त्र वाजसनेयकांत सविस्तर सांगतें.

**भाष्यं—अत्र च विभक्ते विद्याविद्ये परापरे इत्यादावेव शास्त्रस्यातो न तार्किकवादभटप्रवेशो वेदान्तराजप्रमाणबाहुगुप्त इहात्मैकत्वविषय इति ॥**

**भाष्यार्थ**—येथें म्हणजे अथर्वण वेदाच्या मंत्रोपनिषदांत–मुंडकांत-हि शास्त्राच्या आरंभीच ऋग्वेदादिलक्षण अपरा विद्या व अक्षरबोधक परा विद्या यांचा विभाग केला आहे. (त्यावरून विद्या व अविद्या यांचा विषयभेद शास्त्राच्या आरंभींच सुचविलेला आहे.)=यास्तव वेदान्तासारख्या श्रेष्ठ प्रमाणाच्या न्यायसंज्ञक बाहूंनीं उत्तम प्रकारं रक्षिलेल्या या आत्मैकत्वप्रदेशांत तार्किक योद्ध्यांस प्रवेश करितां येणें शक्य नाहीं, अथवा त्यांना प्रवेश करणें उचित नव्हे. (वेदान्त हाच जणुं काय राजा, त्यांतील प्रमाणें–न्याय हेच त्याचे बाहु. त्यांच्या योगानें आत्मैकत्व हा विषय–प्रदेश सुरक्षित आहे. यास्तव मनसोक्त तर्क करणारांचा त्यांत प्रवेश होणें शक्य नाहीं.)

**भाष्यं—एतेनाविद्याकृतनामरूपाद्युपाधिकृतानेकशक्तिसाधनकृतभेदवत्त्वाद्ब्रह्मणः सृष्ट्यादिकर्तृत्वे साधनाद्यभावो दोषः प्रत्युक्तो वेदितव्यः परैरुक्त आत्मानर्थकर्तृत्वादिदोषश्च ॥**

**भाष्यार्थ**—(असो; या एवढ्या प्रतिपादनानें पूर्ववाद्यानें साधनादिकांच्या अभावीं एकच चैतन्य जगत्कर्तृ कसें होईल? इत्यादि जे दोष दिले होते त्यांचें निरसन होतें, असें आतां भाष्यकार सांगतात–)=या प्रतिपादनानेंच 'ब्रह्म अविद्याकृत नाम-रूपादि उपाधिकृत अनेक शक्ति-साधनकृत भेदानें युक्त असल्यामुळें त्याच्याकडे सृष्टिप्रभृति कार्यांचें कर्तृत्व येण्यास साधनादि नसतात' या वाद्यानें दिलेल्या दोषाचें निरसन झालें आहे, असें जाणावें. त्याचप्रमाणें त्याच्यावर आपल्याच अनर्थांचें कर्तृत्व, आप्तकामत्वामुळें प्रयोजनाच्या अपेक्षेची अनुपपत्ति, इत्यादि दोषांचेंहि निरसन झालें आहे. (अविद्याकृत नाम-रूपादि उपाधि; त्या उपाधींमुळें अनेक शक्ति व साधनें; व त्यांच्या योगानें

भेद म्हणजे अनेकत्व अर्थात् औपाधिक अनेकत्व विद्यमान असल्यामुळें वरील दोष येत नाहीं. कल्पनेनें आत्मव्यतिरिक्त जीवाचें सत्त्व असल्यामुळें त्याचा हा संसार आहे, आत्म्याचा नव्हे. त्या काल्पनिक आत्मव्यतिरिक्त जीवाला त्याच्या कर्माचें फल देण्याकरितां आप्तकाम-पूर्णकाम ब्रह्माची सृष्ट्यादि प्रवृत्ति संभवते. अथवा सर्व व्यवहार स्वप्नसदृश असल्यामुळें स्वप्नाप्रमाणेंच सर्व युक्तिशून्यहि उपपन्न होतें, असें म्हणून सूत्रभाष्यादिकांत या दोषाचें निरसन केलें आहे, असा याचा भावार्थ. )

**भाष्यं—यस्तु दृष्टान्तो राज्ञः सर्वार्थकारिणि कर्तर्युपचाराद्राजा कर्तेति सोऽत्रानुपपन्नः। "स ईक्षांचक्रे" इति श्रुतेर्मुख्यार्थबाधनात्प्रमाणभूतायाः। तत्र हि गौणी कल्पना शब्दस्य यत्र मुख्यार्थो न संभवति। इह त्वचेतनस्य मुक्तबद्धपुरुषविशेषापेक्षया कर्तृकर्मदेशकालनिमित्तापेक्षया च बन्धमोक्षादिफलार्था नियता पुरुषं प्रति प्रवृत्तिर्नोपपद्यते। यथोक्तसर्वज्ञेश्वरकर्तृत्वपक्षे तूपपन्ना॥ ३॥**

**भाष्यार्थ**—(सांख्यानें आपल्या पक्षीं पुरुषशब्दाची व ईक्षणाची जी उपपत्ति सांगितली होती तिचा अनुवाद करून भाष्यकार निरसन करितात–)=आतां "राजाचें सर्व कार्य करणाऱ्या कर्त्या भृत्याचे ठिकाणीं 'राजा, कर्ता' हा जसा उपचार होतो त्याप्रमाणें पुरुषार्थ साधून देणाऱ्या प्रधानाचें ईक्षण व पुरुषशब्द गौण आहेत" असें म्हणून सांख्यानें प्रधानाला राजभृत्याचा जो दृष्टान्त दिला होता तो येथें उपपन्न होत नाहीं. कारण तसें समजल्यास 'स ईक्षांचक्रे' या प्रमाणभूत श्रुतीचा मुख्यार्थ बाधित होतो. ( 'यजमानः प्रस्तरः' म्हणजे ही दर्भाची जुडी यजमान आहे, इत्यादि श्रुतिवचनांत उपचार आढळतो, नाहीं असें नाहीं. पण )= जेथें शब्दाचा मुख्यार्थ संभवत नाहीं तेथेंच गौणी कल्पना करावयाची असते. ( प्रधानपक्षीं केवल ईक्षणश्रुतिच अनुपपन्न आहे, असें नाहीं; तर त्याच्या ठिकाणीं वस्तुतः स्रष्टृत्वहि संभवत नाहीं, असें आतां सांगतात–)=पण या प्रस्तुत प्रसंगीं अचेतन प्रधानाची मुक्त व बद्ध अशा विशेष पुरुषाच्या अपेक्षेनें व कर्ता-कर्म-देश-काल-निमित्त इत्यादिकांच्या अपेक्षेनें बंध-मोक्षादि फलाकरितां पुरुषास उद्देशून, नियत प्रवृत्ति उपपन्न होत नाहीं. ( मुक्तांस सोडून केवल बद्धांकरितांच प्रवृत्ति व्हावी. ती कर्ता-कर्म इत्यादिकांच्या अपेक्षेनें भोग-अपवर्ग इत्यादिकांसाठींच व्हावी, इत्यादि प्रकारें अचेतनाची व्यवस्थित प्रवृत्ति उपपन्न होत नाहीं, असा याचा भावार्थ. अर्थात् 'पुरुषार्थ प्रयोजनाच्या उद्देशानें प्रधान प्रवृत्त होतें' या सांख्यांच्या म्हणण्याचा भंग झाला. )=पण यथोक्त सर्वज्ञ ईश्वर कर्ता आहे, या पक्षीं ती ( प्रवृत्ति ) उपपन्न होते. ( ईश्वरकारणवादावर यांतील कोणताहि दोष येत नाहीं, असा याचा भावार्थ. ) ३.

**श्रुतिः—स प्राणमसृजत प्राणाच्छ्रद्धां खं वायुर्ज्योतिरापः पृथिवीन्द्रियं मनः।**
**अन्नमन्नाद्वीर्यं तपो मन्त्राः कर्म लोका लोकेषु च नाम च ॥ ४ ॥**

**अर्थ**—तो पुरुष वर सांगितल्याप्रमाणें ईक्षण करून हिरण्यगर्भाख्य प्राणाला उत्पन्न करिता झाला. त्या प्राणापासून श्रद्धा, आकाश, वायु, तेज, जल, पृथ्वी, इंद्रियें, मन, अन्न, अन्नापासून वीर्य, तप, मंत्र, कर्म, लोक, व लोकांमध्यें नाम उत्पन्न केलें.४

**भाष्यं—ईश्वरेणेव सर्वाधिकारी प्राणः पुरुषेण सृज्यते। कथं। स पुरुष उक्तप्रकारेणेक्षित्वा प्राणं हिरण्यगर्भाख्यं सर्वप्राणिकरणाधारमन्तरात्मानमसृजत सृष्टवान्। अतः प्राणाच्छ्रद्धां सर्वप्राणिनां शुभकर्मप्रवृत्तिहेतुभूताम्। ततः कर्मफलोपभोगसाधनाधिष्ठानानि कारणभूतानि महाभूतान्यसृजत ॥**

**भाष्यार्थ**—( भाष्यकार येणेंप्रमाणें परपक्षाचें निराकरण करून आतां अवशिष्ट श्रुतीचें व्याख्यान करितात- )=राजा जसा आपल्या सर्वाधिकारसंपन्न भृत्याला-अमात्याला निर्माण करितो त्याप्रमाणें पुरुष प्राणाला निर्मितो. तो कसा, तें सांगतों- तो पुरुष पूर्वोक्त प्रकारानें ईक्षण करून प्राणास म्हणजे हिरण्यगर्भसंज्ञक सर्व प्राण्यांच्या इंद्रियांच्या आधारास अंतरात्म्यास ( समष्टि प्राणास, हिरण्यगर्भाख्य जीवाला नव्हे ) निर्माण करिता झाला. त्या प्राणापासून सर्व प्राण्यांच्या शुभकर्मप्रवृत्तीस कारण होणारी श्रद्धा निर्माण केली. श्रद्धेपासून कर्मफलांच्या उपभोगाच्या साधनांचीं ( शरीरांचीं ) अधिष्ठानें म्हणजे शरीरकारणभूत महाभूतें उत्पन्न केलीं.

**भाष्यं—खं शब्दगुणम्। वायुं स्वेन स्पर्शेन कारणगुणेन च विशिष्टं द्विगुणम्। तथा ज्योतिः स्वेन रूपेण पूर्वाभ्यां च विशिष्टं त्रिगुणं शब्दस्पर्शाभ्याम्। तथाऽऽपो रसेन गुणेनासाधारणेन पूर्वगुणानुप्रवेशेन च चतुर्गुणाः।तथा गन्धगुणेन पूर्वगुणानुप्रवेशेन च पञ्चगुणा पृथिवी। तथा तैरेव भूतैरारब्धमिन्द्रियं द्विप्रकारं बुद्ध्यर्थं कर्मार्थं च दशसंख्यम्। तस्य चेश्वरमन्तःस्थं संशयसंकल्पलक्षणं मनः॥**

**भाष्यार्थ**—त्यांतील पहिलें आकाश. त्याचा शब्द हा गुण आहे. दुसरें वायु. तो आपल्या स्पर्शगुणानें व आपल्या कारणाच्या ( आकाशाच्या ) शब्दगुणानें विशिष्ट असल्यामुळें द्विगुण आहे. त्याचप्रमाणें ज्योति ( तेज ) हें तिसरें महाभूत. तें आपल्या रूपानें व शब्द आणि स्पर्श या कारणगत गुणांनीं विशिष्ट असल्यामुळें त्रिगुण आहे. त्याचप्रमाणें आप आपल्या असाधारण रसगुणानें व कारणगुणांच्या अनुवृत्तीनें चतुर्गुण आहे; आणि पृथ्वी गंधगुण व कारणगुणांची अनुवृत्ति यांच्यायोगानें पंचगुणयुक्त आहे. त्याचप्रमाणें त्याच अपंचीकृत भूतांपासून ज्याचा आरंभ झाला आहे, असें इंद्रिय एक ज्ञानाकरितां व दुसरें कर्माकरितां असें दोन प्रकारचें, असून त्याची प्रत्येकीं

पांच या हिशोबानें दहा ही संख्या आहे. ( म्हणजे कर्मेन्द्रियें पांच व ज्ञानेन्द्रियें पांच मिळून इंद्रियें दहा.)आणि त्यांचें नियमन करणारें अंतस्थ संशय-संकल्पलक्षण मन.

**भाष्यं—एवं प्राणिनां कार्यं करणं च सृष्ट्वा तत्स्थित्यर्थं व्रीहियवादिलक्षणमन्नम् । ततश्चान्नादद्यमानाद्वीर्यं सामर्थ्यं बलं सर्वकर्मप्रवृत्तिसाधनम् । तद्वीर्यवतां च प्राणिनां तपो विशुद्धिसाधनं संकीर्यमाणानां । मन्त्रास्तपोविशुद्धान्तर्बहिःकरणेभ्यः कर्मसाधनभूता ऋग्यजुःसामाथर्वांगिरसः । ततः कर्माग्निहोत्रादिलक्षणम् । ततो लोकाः कर्मणां फलम् । तेषु च सृष्टानां प्राणिनां नाम च देवदत्तो यज्ञदत्त इत्यादि । एवमेताः कलाः प्राणिनामविद्यादिदोषबीजापेक्षया सृष्टास्तैमिरिकदृष्टिसृष्टा इव द्विचन्द्रमशकमक्षिकाद्याः स्वप्नदृक्सृष्टा इव च सर्वपदार्थाः पुनस्तस्मिन्नेव पुरुषे प्रलीयन्ते हित्वा नामरूपादिविभागम् ॥ ४ ॥**

**भाष्यार्थ**—याप्रमाणें प्राण्यांचें कार्य व करण उत्पन्न करून त्यांच्या स्थितीकरितां व्रीहि-यवादिलक्षण अन्न,त्या भक्षण केल्या जाणाऱ्या अन्नापासून वीर्य म्हणजे सामर्थ्य—बल, सर्व कर्मप्रवृत्तीचें साधन. त्या वीर्यानें युक्त असलेल्या आणि सत्त्वाच्या अविशुद्धीमुळें पापाचरण करून त्या पापाशीं संकर पावणाऱ्या प्राण्यांच्या चित्तशुद्धीचें साधन तप उत्पन्न केलें; तपाच्या योगानें ज्यांचीं अंत:करणें व बाह्य करणें अतिशय शुद्ध झालीं आहेत त्यांच्या कर्मांस साधनभूत होणारे ऋक्, यजुः, साम व अथर्वांगिरस असे मंत्र; त्यानंतर अग्निहोत्रादिरूप कर्म, त्यानंतर लोक म्हणजे कर्मांचीं फलें आणि त्या कर्मफलभूत लोकांत उत्पन्न केलेल्या प्राण्यांचें देवदत्त, यज्ञदत्त इत्यादि नांव;अशा प्राण्यांच्या अविद्यादिदोषरूप बीजाच्या अपेक्षेनें उत्पन्न केलेल्या या सोळा कला आहेत. त्या तैमिरिक रोगग्रस्ताच्या दृष्टीनें उत्पन्न केलेल्या—दोन चंद्र, मशक, मक्षिका, इत्यादिकांप्रमाणें व स्वप्नद्रष्ट्यानें निर्मिलेल्या सर्व पदार्थांप्रमाणें आरोपित आहेत. ( याप्रमाणें आत्मप्रतिपत्त्यर्थ—आत्मसाक्षात्कारार्थ, अध्यारोप सांगून आतां त्याच्या अपवादाचें अवतरण करितात—)=त्या नाम-रूपादि विभागाचा त्याग करून पुनः त्या कला त्याच पुरुषामध्यें प्रलीन होतात ४.

**श्रुतिः—स यथेमा नद्यः स्यन्दमानाः समुद्रायणाः समुद्रं प्राप्यास्तं गच्छन्ति भिद्येते तासां नामरूपे समुद्र इत्येवं प्रोच्यते । एवमेवास्य परिद्रष्टुरिमाः षोडश कलाः पुरुषायणाः पुरुषं प्राप्यास्तं गच्छन्ति भिद्येते चाऽऽसां नामरूपे पुरुष इत्येवं प्रोच्यते स एषोऽकलोऽमृतो भवति तदेष श्लोकः ॥ ५ ॥**

**अर्थ**— तो दृष्टान्त असा—ज्याप्रमाणें समुद्रच ज्यांची गति आहे अशा या वाहणाऱ्या नद्या समुद्राला प्राप्त होऊन अस्त पावतात, त्यांचीं नामरूपेंहि नाहींशीं होतात व त्यांना ‘समुद्र’ असेंच म्हणतात;त्याचप्रमाणें या सर्वतः द्रष्ट्याच्या ‘पुरुष’ हेंच ज्यांचें

अधिष्ठान आहे अशा या वरील सोळा कला पुरुषास प्राप्त होऊन अस्त पावतात. त्यांचें नाम व रूप नाश पावतें. त्यांना पुरुष असेंच म्हणतात. तो हा विद्वान् अकल व अमृत होतो. या अर्थी हा मंत्र आहे. ५.

**भाष्यं—कथम्–स दृष्टान्तः । यथा लोक इमा नद्यः स्यन्दमानाः स्रवन्त्यः समुद्रायणाः समुद्रोऽयनं गतिरात्मभावो यासां ता समुद्रायणाः समुद्रं प्राप्योपगम्यास्तं नामरूपतिरस्कारं गच्छन्ति । तासां चास्तं गतानां भिद्येते विनश्यतो नामरूपे गङ्गायमुनेत्यादिलक्षणे।तदभेदे समुद्र इत्येवं प्रोच्यते तद्वस्तूदकलक्षणं ॥**

**भाष्यार्थ**—त्या कशा लीन होतात (तें दृष्टान्तपूर्वक सांगतात–) 'स यथा दृष्टान्तः'—ज्याप्रमाणें या लोकामध्यें 'इमा नद्यः स्यन्दमानाः'—संतत प्रवाहरूपानें वाहणाऱ्या या नद्या 'समुद्रायणाः'—समुद्र हेंच ज्यांचें अयन–गति–आत्मभाव आहे अशा होत्सात्या 'समुद्रं प्राप्य'—समुद्रास प्राप्त होऊन–मिळून 'अस्तं गच्छन्ति'—अस्त पावतात, आपलें पूर्व रूप व नांव यांचा तिरस्कार करून–यांस सोडून समुद्ररूप होतात, 'भिद्येते तासां नामरूपे'—अस्त पावलेल्या त्यांचें गंगा-यमुना इत्यादिलक्षण नाम-रूप विनष्ट होतें आणि 'समुद्र इत्येवं प्रोच्यते'—त्याचा अभेद झाला असतां त्या अवशिष्ट राहिलेल्या उदकलक्षण वस्तूला समुद्र असेंच म्हणतात.

**भाष्यं—यथाऽयं दृष्टान्तः । उक्तलक्षणस्य प्रकृतस्यास्य पुरुषस्य परिद्रष्टुः परि समन्ताद्द्रष्टुर्दर्शनस्य कर्तुः स्वरूपभूतस्य यथाऽर्कः स्वात्मप्रकाशस्य कर्ता सर्वतस्तद्वदिमाः षोडश कलाः प्राणाद्या उक्ताः कलाः पुरुषायणा नदीनामिव समुद्रः पुरुषोऽयनमात्मभावगमनं यासां कलानां ताः पुरुषायणाः पुरुषं प्राप्य पुरुषात्मभावमुपगम्य तथैवास्तं गच्छन्ति । भिद्येते चाऽऽसां नामरूपे कालानां प्राणाद्याख्या रूपं च यथास्वम् । भेदे च नामरूपयोर्यदनष्टं तत्त्वं पुरुष इत्येवं प्रोच्यते ब्रह्मविद्भिः ॥**

**भाष्यार्थ**—'एवं'—त्याप्रमाणें, या नद्यांच्या दृष्टान्ताप्रमाणेंच 'अस्य परिद्रष्टुरिमाः०'—या उक्तलक्षण प्रकृत समंतात् भागीं पाहणाऱ्या–ज्याप्रमाणें सूर्य आपल्या प्रकाशाचा सर्वतः कर्ता त्याप्रमाणें सर्वतः दर्शन करणाऱ्या स्वरूपभूत पुरुषाच्या या पूर्वोक्त प्राणादि सोळा कला, नद्यांचा जसा समुद्र त्याप्रमाणें 'पुरुषायणाः'—पुरुष ज्यांचें अयन–आत्मभावगमन आहे अशा होत्सात्या पुरुषास प्राप्त होऊन, पुरुषात्मभावास प्राप्त होऊन, नद्यांप्रमाणेंच अस्त पावतात; (या दृष्टान्ताचें रहस्य असें–समुद्राच्या स्वरूपभूत जलाला मेघ वर आकर्षण करून घेतात व पुनः त्याचा वर्षाव करितात. त्याच्याच गंगा-यमुना-गोदावरी-कृष्णा-कावेरी इत्यादि नद्या नाम-रूप-उपाधीमुळें समुद्राहून भिन्नशा भासतात, पण त्या उपाधींचा क्षय झाला असतां त्या समु-

द्राच्या स्वरूपासच प्राप्त होतात, त्याप्रमाणें अविद्याकृत नाम-रूप उपाधीमुळें आत्म्याहून भिन्नसें असलेलें सर्व जगत् विद्येनें अविद्याकृत नाम-रूपाचा विनाश झाला असतां ब्रह्ममात्र राहतें.)=त्या कलांचें प्रत्येकीं भिन्न भिन्न प्राणादि नाम व असाधारण रूप नाश पावतें, नाम व रूप यांचा भेद (म्हणजे अस्तगमन) झाला असतां जें विनाश न पावलेलें तत्त्व राहतें त्यालाच ब्रह्मवेत्ते ' पुरुष ' असें म्हणतात. ( कलांचें स्वरूप आरोप्य व अधिष्ठान, असें उभयप्रकारचें असतें. आरोप्य म्हणजे ज्याचा आरोप करावयाचा व अधिष्ठान म्हणजे ज्याच्यावर आरोप करावयाचा. जसें रुपें आरोप्य व शिंप अधिष्ठान. सर्प आरोप्य व दोरी अधिष्ठान. त्यांतील आरोप्य मिथ्या व अधिष्ठान सत्य असल्यामुळें कलांचें स्वरूप सत्य-मिथ्यारूप आहे. त्यांतील नाम-रूपात्मक आरोप्याचा अस्त झाला असतां अवशिष्ट राहणाऱ्या सत्य अधिष्ठानाला पुरुष म्हणतात. )

**भाष्यं—य एवं विद्वान्गुरुणा प्रदर्शितकलाप्रलयमार्गः स एष विद्यया प्रविलापितास्वविद्याकामकर्मजनितासु प्राणादिकलास्वकलोऽविद्याकृतकलानिमित्तो हि मृत्युस्तदपगमेऽकलत्वादेवामृतो भवति । तदेतस्मिन्नर्थ एष श्लोकः ॥ ५ ॥**

**भाष्यार्थ**—' स एषः० '–गुरूनें ज्याला कलाप्रलयमार्ग दाखविला आहे असा जो हें वरील तत्त्व जाणतो तो विद्येच्या योगानें अविद्या-काम-कर्मजनित प्राणादि कलांचा विशेष प्रकारें अस्त झाला असतां अकल–कलारहित होतो. मृत्यु अविद्याकृत कलांच्या निमित्तानेंच येत असतो. यास्तव कलांचा अपगम होऊन पुरुष अकल झाल्यामुळेंच अमृत होतो. ( उत्क्रमण म्हणजे मरण व जननादि इतर शब्द यांचा व्यवहार प्राणादि कलारूप उपाधींमुळेंच होतो. त्यामुळेंच प्राणादि कलांची निवृत्ति झाली असतां उत्क्रमणादि सर्व संसारधर्मरहित आत्मस्वरूप राहतें व तें राहणें हेंच वेदान्तविचाराचें फल आहे. ) या अर्थी हा पुढचा श्लोक–मंत्र आहे. ५.

**श्रुतिः—अरा इव रथनाभौ कला यस्मिन्प्रतिष्ठिताः तं वेद्यं पुरुषं वेद यथा मा वो मृत्युः परिव्यथा इति ॥ ६ ॥**

**अर्थ**—रथचक्राच्या नाभीमध्यें जसे अर त्याप्रमाणें ज्यामध्यें या सोळा कला प्रतिष्ठित आहेत त्या वेद्य–ज्ञेय पुरुषाला जाणावें. ज्यामुळें हे शिष्यांनो, मृत्यु तुम्हांला पीडा न देवो.

**भाष्यं—अरा रथचक्रपरिवारा इव रथनाभौ रथचक्रस्य नाभौ यथा प्रवेशितास्तदाश्रया भवन्ति यथा तथेत्यर्थः । कलाः प्राणाद्या यस्मिन्पुरुषे प्रतिष्ठिता उत्पत्तिस्थितिलयकालेषु तं पुरुषं कलानामात्मभूतं वेद्यं वेदनीयं पूर्णत्वात्पुरुषं पुरि शयनाद्वा वेद जानीयात् । यथा हे शिष्या मा वो युष्मान्मृत्युः परिव्यथा मा परिव्यथयतु । न चेद्विज्ञायेत पुरुषो मृत्युनिमित्तां व्यथामापन्ना दुःखिन एव यूयं स्थ । अतस्तन्मा भूद्युष्माकमित्यभिप्रायः ॥ ६ ॥**

**भाष्यार्थ**--रथचक्राच्या नाभीमध्यें ठोकून घट्ट बसविलेल्या अरांप्रमाणें (चाकांतील आडव्या काष्ठांप्रमाणें) रथचक्राच्या परिवाराप्रमाणें म्हणजे ते अर नाभीमध्यें शिरकवून घट्ट ठोकले असतां जसे तिच्या आश्रयानेंच राहतात त्याप्रमाणें असा भावार्थ. प्राणादि कला उत्पत्ति, स्थिति व लय या तिन्ही कालीं ज्या पुरुषामध्यें प्रतिष्ठित होतात त्या कलांच्या आत्मभूत व अवश्य जाणण्यास योग्य पुरुषास जाणावें. तो पूर्ण असल्यामुळें, सर्वव्यापी असल्यामुळें त्याला पुरुष म्हणतात अथवा शरीरलक्षण नवद्वारयुक्त पुरीमध्यें राहत असल्यामुळें पुरुष म्हणतात. हे शिष्यांनो, त्याला जाणलेंत म्हणजे मृत्यु तुम्हांला अतिशय पीडा देणार नाहीं. पण तुम्ही जर त्या पुरुषाला न जाणाल तर मृत्युनिमित्त व्यथेस प्राप्त होऊन दुःखीच व्हाल.यास्तव तुम्हांला तें दुःख न होवो, असा भावार्थ.

श्रुतिः—**तान्होवाचैतावदेवाहमेतत्परं ब्रह्म वेद । नातः परमस्तीति ॥ ७ ॥**

**अर्थ**—पिप्पलाद त्या शिष्यांस म्हणाला—" मी एवढेंच हें पर ब्रह्म जाणतों. याहून अन्य कांहीं वेद्य आहे, असें जाणत नाहीं. " ७.

**भाष्यं—तानेवमनुशिष्य शिष्यांस्तान्होवाच पिप्पलादः किलैतावदेव वेद्यं परं ब्रह्म वेद विजानाम्यहमेतत् । नातोऽस्मात्परमस्ति प्रकृष्टतरं वेदितव्यमित्येवमुक्तवाञ्शिष्याणामविदितशेषास्तित्वाशङ्कानिवृत्तये कृतार्थबुद्धिजननार्थं च ॥७**

**भाष्यार्थ**—त्या शिष्यांना, असा उपदेश करून ( त्यांची कृतार्थता बुद्धि उत्पन्न करण्याकरितां ) पिप्पलाद मुनि म्हणाले-" मी खरोखर हें एवढेंच वेद्य पर ब्रह्म जाणतों. याहून आणखी अधिक वेदितव्य ( वेद्य, जाणण्यास योग्य ) राहिलेलें नाहीं. आचार्यांनें शिष्यांची आपल्याला न कळलेलें असें आणखीं कांहीं विशेय अवशिष्ट राहिलें असेल,ही शंका घालविण्याकरितां व कृतार्थ बुद्धि उत्पन्न करण्याकरितां हें सांगितलें आहे.७.

श्रुतिः—**ते तमर्चयन्तस्त्वं हि नः पिता योऽस्माकमविद्यायाः परं पारं तारयसीति । नमः परमऋषिभ्यो नमः परमऋषिभ्य ॥ ८ ॥ (६)**

**ॐ भद्रं कर्णेभिरिति शान्तिः ॥**

**इत्यथर्ववेदीया प्रश्नोपनिषत्समाप्ता ॥**

**अर्थ**--तेव्हां ते शिष्य त्याची पूजा करीत होत्साते ' जो तूं आम्हांला अविद्येच्या पर तीरास पोंचवीत आहेस तो तूंच आमचा पिता आहेस ' असें म्हणाले. परम ऋषींना नमस्कार असो; परम ऋषींना नमस्कार असो. ८.

**भाष्यं--ततस्ते शिष्या गुरुणाऽनुशिष्टास्तं गुरुं कृतार्थाः सन्तो विद्यानिष्क्रयमपश्यन्तः किं कृतवन्त इत्युच्यते-अर्चयन्तः पूजयन्तः पादयोः पुष्पाञ्जलिप्रकिरणेन प्राणिपातेन च शिरसा किमूचुरित्याह-त्वं हि नोऽस्माकं पिता**

**ब्रह्मशरीरस्य विद्यया जनयितृत्वान्नित्यस्याजरामरस्याभयस्य । यस्त्वमेवास्माकमविद्याया विपरीतज्ञानाज्जन्मजरामरणरोगदुःखादिग्रहादविद्यामहोदधेर्विद्याप्लवेन परमपुनरावृत्तिलक्षणं मोक्षाख्यं महोदधेरिव पारं तारयस्यस्मान्नित्यतः पितृत्वं तवास्मान्प्रत्युपपन्नमितरस्मात् । इतरोऽपि हि पिता शरीरमात्रं जनयति तथाऽपि स प्रपूज्यतमो लोके किमु वक्तव्यमात्यन्तिकाभयदातुरित्यभिप्रायः । नमः परमऋषिभ्यो ब्रह्मविद्यासंप्रदायकर्तृभ्यो नमः परमऋषिभ्यइतिद्विर्वचनमादरार्थम्**

**इति श्रीमच्छंकरभगवत्कृतं प्रश्नोपनिषद्भाष्यं समाप्तिमगमत् ॥**

**भाष्यार्थ**--' ते तमर्चयन्तः '-त्यानंतर गुरूनें ज्यांना असा उपदेश केला आहे असे ते शिष्य कृतार्थ होत्साते विद्येचा उचित निष्क्रय-मूल्य, न दिसल्यामुळें त्या गुरूला काय करिते झाले-काय म्हणाले तें श्रुति सांगते-ते शिष्य पायांवर पुष्पांजलि वाहून व शिरसा नमस्कार करून म्हणजेच गुरूची पूजा करून काय म्हणाले तेंच पुढें सांगितलें आहे-' त्वं हि नः पिता '-तूंच आमचा पिता आहेस. कारण विद्येच्या योगानें आमच्या नित्य, अजर, अमर व अभय ब्रह्मशरीराचें उत्पादकत्व तुजकडे आहे.' योऽस्माकं०'-जो तूंच आम्हांस 'अविद्यायाः'-विपरीत ज्ञानरूप अविद्येपासून,जन्म-जरा-मरण-रोग-इतर दुःख (अथवा यांचें दुःख) इत्यादि हेच ज्यांतील ग्राह -सुसरी आहेत अशा अविद्यामहासागरांतून विद्यारूपी नौकेनें ' परं पारं तारयसीति ' -महासागराच्या पर तीरासारख्या पुनरावृत्तिरहित, पुनर्जन्मशून्य, मोक्षाख्य पर पारास -तीरास पोंचवीत आहेस [ तेथपर्यंत तारून नेत आहेस ] यास्तव इतर [ जनक ] पित्याहून आम्हांला तुझें पितृत्वच युक्त आहे. इतर पिता तर केवल शरीर निर्माण करितो. तथापि तो लोकांमध्यें अतिशय पूज्य होतो. मग आत्यंतिक-नित्य अभय देणाऱ्या गुरूच्या पितृत्वाविषयीं व अति पूज्यतेविषयीं काय सांगावें ? ब्रह्मविद्यासंप्रदायकर्त्या परम ऋषींना नमस्कार असो. परम ऋषींना नमस्कार असो. आदराकरितां दोनदा नमस्कार केला आहे. ८. ( ६ )

इति श्रीशंकराचार्यभक्त विष्णुशर्मकृत प्रश्नोपनिषद्भाष्यार्थाचा साहवा

प्रश्न समाप्त झाला.

**ॐ तत्सद्ब्रह्मार्पणमस्तु.**

